


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या सिद्धीसाठीं हातभार!

भरतीमातेनें प्रसन्न होऊन अनंत हस्तांनीं दिलेलें लक्षावधि टन धान्य सांठवणीसाठीं गुदामांतून ठेवलें जात आहे...

पण पिकें अमाप यायला हवींत तर प्रथम जमिनीला पाण्याचा पुरवठा वेळच्यावेळीं नि भरपूर होणें आवश्यक आहे. **किर्लोस्कर डिझेल एंजिनें** नेमक्या याच बाबतींत महत्त्वाची कामगिरी बजावीत असतात.

वर्षानुवर्षें खूप अन्नधान्य पिकावें म्हणून नदीनाले, विहिरी, तळीं यांतून पाणी वर खेंचून काढणाऱ्या पंपांना तीं शक्तीचा हमखास पुरवठा करतात.

अनेक वर्षांच्या अनुभवानें नि संशोधनानें पूर्णत्वास पोहोंचलेलीं आणि साऱ्या जगभर उत्कृष्ट दर्जा व हमखास कामगिरीबद्दल नांवाजलेलीं हीं एंजिनें आज तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत हजारों शेतकऱ्यांना अधिक धान्य पिकविण्याच्या कार्मी मदत करून भारतीय सरकारपुढील एक महत्वाचा प्रश्न सोडविण्यास हातभार लावीत आहेत.

किर्लोस्कर

५ हॉर्स पॉवर डिझेल एंजिन

**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड,**
खडकी, पुणें-३ (भारत)

TOM & BAY/KOEL-15/62












एप्रिल १९६३
वर्ष १९ वें

श्रेयनामावलि—

- **पांच कथा**—शिरीष पै, पुरुषोत्तम धाक्रस, रत्नाकर कौलगुड, रजनी कर्णिक, अनंत तडवळकर ● **चालू कादंबरी**—श्रीराम कामत, ● **दोन ललित लेख**—आत्माराम नीलकंठ, विठ्ठल रा. भाटकर, ● **एक वैचारिक लेख**—वसंत फेणे, ● **दोन कविता**—प्र. ना. परांजपे ● **तीन मुक्तकें**—भास्कर कविमंडन.
- **सदरें**— सारस्वत, गोपालन, रसिक मनोहर आणि व्यंगचित्रें, विंगचित्रें, हास्यचित्रें इ. इ.

टे. नं. ७७७६५
Gram DALALART

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अभिकृत मतें असतातच असें नाहीं.










**दलाल आर्ट स्टूडियो**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोनः ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावळी व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६–००

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी, चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडियोच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● जाहिरातींचा व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकाच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येतें. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय-महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

---

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# ही ब्रह्मांडाला गवसणी नव्हे !....

**विविध** रुचींच्या वाचकांचीं विविध तऱ्हेचीं पत्रें येतात. कांहींनी बेफाट स्तुति केलेली असते. कांहींनीं माफक प्रमाणांत गुण गायलेले असतात. कांहींनी केवळ रसग्रहण केलेलें असतें; तर कांहींनी धमक्याहि दिलेल्या असतात. 'तुमच्याकडे गटबाजी आहे. ठराविक लोकांचेंच साहित्य तुम्हीं देतां. आमची कथा स्वीकारून सहा महिने झाले. अजूनपर्यंत तुम्ही ती कां दिली नाहीं ?' असा जोरदार सवालहि असतो. अशा सवालांची आणि वैचित्र्यतापूर्ण पत्रांची नियतकालिकांच्या चालकांना संवय असते. स्तुतीनें आनंद होतो. रसग्रहणाला मन धन्यवाद देतें. धमक्यांचा राग येतो आणि आरोपांना उत्तर द्यायची खुमखुमी येते.

दीपावलीकडे गटबाजी कधींहि नव्हती आणि नाहींहि. चांगल्या साहित्याची–नव्या जीवानांशीं सुसंगत प्रश्नांची शहानिशा केलेल्या साहित्याची दीपावलीनें नेहमींच कदर केलेली आहे. वारंवार उत्तेजन दिलेलें आहे. गेल्या कित्येक अंकांचें तसेंच त्यांतील कथांचें रसग्रहण वाचकांनीं मोठ्या आवडीनें केलेलें आहे. श्री. जयवंत दळवींच्या विडंबन मालेचें कौतुक अमाप झालें. तसेंच आत्माराम नीलकंठांच्या 'जय नांवाच्या इतिहासाचें'हि झालें. अनेकांनीं प्रत्यक्ष भेटून मनापासून स्तुति केली. अलीकडील कांहीं 'विभंग' 'चौरंग' 'आसोस,' 'दकल' 'धुकं' या गोष्टी उत्तम असल्याची पावती वाचकांकडून मिळालेली आहे. या गोष्टींचे लेखक कोणत्याहि गटांतील नसावेत अशी आमची प्रामाणिक समजूत आहे.

कधीं कधीं एखादी साहित्यकृति स्वीकारल्यानंतर ती चांगली असूनहि तिच्या अवास्तव विस्तारामुळें ती दप्तरीं पडून रहाते. हा दोष परिस्थितीचा आहे. कागदाची टंचाई, आवश्यक गोष्टींचें दुर्भिक्ष, बाजारी चढाओढीचा वेग या अडीअडचणीमुळें केव्हां केव्हां संकल्प आणि सिद्धि यांच्यामधल्या इच्छेबरहुकूम चालावें लागतें. सहा महिनेपर्यंत स्वीकृत साहित्य कां पडून रहातें, या वरील आरोपाला हा खुलासा पुरेसा होईल असें आम्हांला वाटतें.

'आत्मस्तुति आणि परनिंदा, कधीं नको रे गोविंदा' अशी एक म्हण आहे; परंतु सध्याचें जग हें आत्मस्तुतीचें आहे. अवास्तव आत्मप्रौढीचें आहे. लायक नालायक सगळेच आपला ढोल बडवण्यांत गर्क आहेत. या कोलाहलांत श्री समर्थांची–'आपुली आपण करी स्तुति। तो एक...' या ओवीची हृदयाशीं घट्ट जपणूक करणाऱ्याचा पाड लागणें कठीण. म्हणून हें आधीं केलेलं सांगण्याचा नम्र प्रपंच.

या अंकांतील सौ. शिरीष पै यांच्या 'खडक चांफा' या प्रदीर्घ गंधकथेकडे तसेंच आजचे तरुण व समर्थ कथाकार श्री. श्रीराम कामत यांच्या 'भीष्माचा डोंगर' या चालू झालेल्या कादंबरीकडे रसिक वाचकांचें आम्हीं मुद्दाम लक्ष वेधूं इच्छितों. वाचकांनी आपल्या अनुभूतीचें अभिप्राय वेळांत वेळ काढून मुद्दाम कळवावेत. विनोदी विभागांतहि कांहीं डौलदार लेखण्यांची भर पडलेली आहे. त्यांचीहि दखल वाचकांनीं घ्यावी.

'आवळ्याची मोट बांधण्यांत तुम्हीं कितपत यशस्वी होणार तेंच माझं मत्सरी मन पाहाणार आहे !' असें एका चतुर वाचकाचें आलेलें पत्र आम्हीं गेल्या अंकांत दिलेलें आहे. त्याला उत्तर एवढेंच, कीं बाबारे मराठी माणसाची मनोवृत्ति जिद्दीची आहे. आमचा प्रयत्न ब्रह्मांडाला गवसणी घालायचा मुळींच नाहीं; परंतु जें कांहीं करायचें तें अत्यंत प्रामाणिकपणानें आणि परंपरेची जाणीव ठेवून नव्या वाटा शोधीत रास्त मर्यादेनें करायचें, असा बाणा ठेवून. त्यांत यशस्वी होणें न होणें हें 'जेहत्ते कालाच्या ठायीं आहे' !

●●●



अनुक्रमणिका

संपादक, 'दीपावली' यांस—

आपल्या मार्चच्या अंकामध्यें कलाविद यांनीं केलेलें लांबचें आहे सोसायटीच्या प्रदर्शनावरील परीक्षण वाचलें आणि आपल्या कलासमीक्षकांनी केलेली टीका अवास्तव व गैरवाजवी वाटली म्हणून खुलाशासाठीं हें पत्र लिहीत आहे.

(१) सोसायटीनें आपली उत्तम परंपरा सोडली असें आपण म्हणतां. त्याआधीं आपणच लिहितां कीं जग बदलत आहे, कलाविश्वांत क्रांति घडत आहे. अशावेळीं जुन्या परंपरेला चिकटून पूर्वीसारखींच प्रदर्शनें भरवावींत असा अट्टाहास कां असावा ? तसें पाहिलें तर सोसायटीच्या प्रदर्शनांत वेळोवेळीं बदल होत गेला आहेच. एकेकाळीं कलाकुसरीच्या गोष्टी, आर्किटेक्चर व कमर्शियल आर्ट यांचा पण समावेश प्रदर्शनांत होत असे. त्या गोष्टी हळू-हळू कमी होऊन कालमानाप्रमाणें सुधारणा होत गेली.

परंपरा आणि रुढी या गोष्टी चांगल्या खऱ्या, पण त्याहीपेक्षां नवी परंपरा निर्माण करणें हें श्रेष्ठ आहे हें आपल्यालाही मान्य असेल. त्यादृष्टीनें कलेतील प्रत्येक अंगाला पूर्ण वाव मिळावा म्हणून परंपरेला सोडून 'नव्या दमाच्या' कमिटीनें बऱ्याच नव्या गोष्टी केल्या आहेत हें मान्य आहे. या वर्षी फोटोग्राफी, शिल्पकला व शालेय कला हे विभाग प्रदर्शनांतून काढून त्यांचीं स्वतंत्र प्रदर्शनें भरविण्याचें ठरवलें. ही एक परंपरा सोडली खरी ! !

(२) 'नाविन्याच्या आहारीं' जाऊन तैलचित्रें, जलचित्रें असे तांत्रिक भाग न करतां यावेळीं प्रदर्शनांत निरनिराळे शैलीवजा (School-wise) विभाग पाडले आहेत असें आपण म्हणतां. परंतु या बदलत्या युगांत तंत्राला महत्व राहिलें नाहीं हें आपणांस सांगणें न लगे. एकाच चित्रांत जलरंग पेस्टल, वॅक्स (मेण), धातू, लाकूड, पत्रा वगैरे वापरतां येतात तेव्हां त्या चित्राला आपण कोणत्या सदरांत टाकाल ? कलेंत तंत्राला महत्व नसून परिणामाला महत्व असतें. म्हणून पूर्वीचे तांत्रिक विभाग सोडणें आवश्यक होत.

(३) कला आंतरराष्ट्रीय असावी कीं त्यांत देशकालानुसार भिन्नभिन्न प्रकार असावेत हा वादाचा मुद्दा आहे. आमच्याकडील कांहीं टीकाकार म्हणतात कीं कला आंतरराष्ट्रीय



असावी; पण हें त्यांचें म्हणणें ते फक्त चित्रकलेलाच लावूं इच्छितात ! देशादेशांतील नृत्य पद्धती भिन्न असतात, संगीत निराळें असूं शकतें, त्यांचें मूल्यमापन अलग होऊं शकतें; पण चित्रकलेच्या बाबतींत मात्र या विद्वानांना एक परिमाण पाहिजे असतें—आणि तेंही जागतिक !

आपल्याच देशांत कथ्थक, भरतनाट्यम्, कथाकली इत्यादी नृत्यपद्धती आहेत. त्यांना अजमावण्याचीं मूल्यें भिन्न आहेत. एक पद्धती दुसऱ्यापेक्षां वरचढ आहे असें म्हणणेंही अयोग्य आहे. प्रत्येक व्यक्तीच्या प्रकृतीप्रमाणें तो त्या पद्धतीचा स्वीकार करतो. एका शैलीचा वादक वा गायक दुसऱ्या पद्धतीचा परीक्षक होऊं शकणार नाहीं (अपवाद सोडून)—त्याचप्रमाणें चित्रकलेंतही पद्धती आहेत. त्यांचें मूल्यमापन एकाच मापानें न करतां त्या त्या क्षेत्रांचे विभाग पाडून त्यांतलेच तज्ञ परीक्षक ठेवून चार विभाग केले तर बिघडलें कोठें ? उलट आपल्या सारख्यांना पाठिंबा असावयास हवा.

गेलीं अनेक वर्षें अशी 'परंपरा' होती कीं पाश्चात्य आधुनिक तंत्रानें केलेलीं चित्रें श्रेष्ठ ठरत. त्याचा परिणाम म्हणजे इतर पध्दतींचा अधःपात व भोंगळ हिंदी पध्दतीचीं चित्रें शतायर मोजण्याइतकीं असत. पोर्ट्रेट व निसर्गचित्रें गोडाऊन (Godown) मध्यें पडूं लागलीं ! आणि फक्त आधुनिक पाश्चात्य कलेच्या चित्रांना Creative व Contemporary हीं विशेषणें लावून प्राधान्य मिळूं लागलें. वास्तविक हीं Creative चित्रें युरोपमधल्या कुठल्या उगमापासून 'निर्माण' झाली असतील हें पहाणें फारसें अवघड नव्हतें. पण आपल्याकडच्या दोन-चार गोऱ्या समीक्षकांपुढें कोणाची बोलण्याची छाती नसे.

(४) तेव्हां हे शैलीवजा गट पाडून सर्वांच्या चित्रकृतींना सारखा वाव देण्यासाठींच हे विभाग करण्यांत आले. 'नाविन्या'साठीं नव्हे. कलेचा आविष्कार मग तो कोणत्याहि पद्धतीनें केलेला असो—तो सारखाच उत्तम, या तत्त्वावर सर्व विभागांना सारखीं बक्षिसें ठेवलीं गेलीं. त्या त्या शैलीनिहाय तज्ञ म्हणून निरनिराळे परीक्षक नेमले गेले ! डॉ. मोतिचंदासारखे हिंदी कलातज्ञ व हुसेनसारखे आधुनिक

...पान ५८ वर

वांकेल पण मोडणार नाहीं !



चिनी आक्रमणाविरुद्ध अंतिम विजयासाठीं सर्वांनी भार उचलणें जरुरीचें आहे - इति मोरारजी









*तो दिव्य सुवास तिनं अवघ्या देहांत ओढून घेतला, शरीरांतली नसनस त्या गंधानुभूतीनं तिनं थरकू दिली. ती स्वतःला विसरली, स्वतःच्या आयुष्याला विसरली आणि त्या स्वर्गीय गंधांत तिची शुद्धबुद्ध हरपली.....*

# एक चंपा



बरोबर हाच वास! नेमका हाच! इतकाच तीव्र आणि उत्कट. काल दुपारीं तिनं प्रथम हुंगला होता....आणि आज फिरून अनुभवाला आला! काल ह्या वेळेपेक्षां जरा लौकर आला होता हा वास.

तिचा नवरा नुकताच जेवून आचवायला उठत होता. तिच्या तिन्ही मुली लौकर जेवून जांभळाच्या सांवलींत घरकुल मांडून खेळायला बसल्या होत्या. तिनं आग्रहानं नवऱ्याचं पान फणसाच्या पारावर मांडलं होतं. तो म्हणाला होता, 'उगीच बाहेर कशाला? घरांतच जेवीन. पाहिजे तर, व्हरांड्यांत मांड पानं' ती मनाशीं नुस्तीच हंसली होती, 'कशी बाई हौसच नाहीं ह्यांना', नवऱ्याला ऐकूं जाईल न जाईल अशा स्वरांत ती स्वतःशी पुटपुटली देखील. पण आपला हट्ट तिनं पुरा केला. आपलं नी नवऱ्याचं पान तिनं फणसाच्या पारावरच वाढायला घेतलं. उघड्या हवेंत तिखट जेवण जिवाला गोड लागतं म्हणूंन तिनं मसुरीचं कांदा-खोबरं भाजून लावलेलं झणझणीत कालवण केलं होतं. हातसडीच्या तांदळाचा मोकळा, गोड भात आणि तेलांत परतलेलं वांग्याचं भरीत-बस, इतकाच साधा पण चटकदार बेत केला होता. शेवटीं खायला साईचं दही लावलं होतं. तें साधं पण रुचकर जेवण जेवतां जेवतां ती हरखून जाऊन नवऱ्याला सारखी म्हणत होती, 'किती छान झालंय् हो कालवण! आज माझ्या हातून मसाला कसा अचूक पडलाय्. आणि तिखट हवं तितकंच झालंय.' आपण केलेल्या पदार्थांवर ती स्वतःच भाळली होती आणि ते चवीनं खातां खातां ती आपणच आपली मनापासून स्तुति करीत होती. तिच्या नवऱ्याला तें तितकसं आवडलं नसावं; किंवा त्याचं तिच्यांकडे म्हणावं तितकं लक्षच नव्हतं कदाचित्. त्यानं मांडीवर एक इंग्रजी मासिक उघडून ठेवलं होतं. 'मानवी आत्मा आणि मानवाच्या भौतिक गरजा' अशा स्वरूपाचा एक जड निबंध तो एकीकडे मन लावून वाचीत होता आणि दुसरीकडे जेवत होता. तसा जेवत होता चांगला व्यवस्थित. ती पुन्हां पुन्हां त्याला म्हणत होती, 'छान झालंय कालवण, नाहीं का?'

'हुं! अं?'

'म्हटलं, कालवण छान झालंय!'

'अं? अं......हो, छान झालंय!'

'आवडलं ना तुम्हाला?'

'अं? अं...होऽ आवडलं कीं.'

'मग आणखी थोडं घ्या कीं.'

'नको. बस झालं.'

'असं काय करता? घ्या कीं थोडं. इतकं चांगलं झाल्यासरशी...'

'नको म्हटलं ना.'

'थोडं घ्या हो.'

'थांब ग...मला एवढं पान वाचूं दे.

ती मनांतल्या मनांत खट्टू होऊन त्याला वाढतां वाढतां वाढायची थांबली. ओठ मुरगटून मनांतल्या मनांत म्हणाली, 'किती चांगलं जेवण करा, चुकून शब्दानं म्हणायचे नाहींत कीं आवडीनं मागून घ्यायचे नाहींत.'

तिचा नवरा भसाभसा जेवून उठला तरी ती पानावर रेंगाळत बसली होती, हळुहळु जेवत होती, कालवणाचे भुरके मारीत होती, जेवणाची चव पुन्हां पुन्हा हुरकून चाखून बघत होती, जेवता जेवता इतस्ततः नजर फिरवीत होती. आजूबाजूला डोंगर, पायथ्याशीं बंगला, पुढं पसरलेलीं विस्तीर्ण माळरानं आणि माळरानांपलीकडे लागलेल्या निळ्या जांभळ्या डोंगरांच्या लांबलचक रांगा. वर खुलं, झळझळीत निळं आभाळ. भोवतालीं उंच उंच वाढलेले आंब्या-फणसाचे वृक्ष. ह्या

—शिरीष पै



बंगल्यांत त्यांना येऊन आठवडासुद्धां झाला नव्हता, तोंच गेल्या तीन महिन्यांच्या तिच्या प्रकृतीच्या तक्रारी चुटकीसरशीं दूर झाल्यां होत्या. तिच्या नवऱ्याच्या मित्राचा हा बंगला ! तो नेहमी तिच्या नवऱ्याला आपल्या बंगल्यांत येऊन रहायचा आग्रह करायचा. पण नवरा आपलं काम सोडून बाहेरगांवीं गेला तरी फक्त आपल्या कामाकरता जायचा. ह्यावेळीं सुद्धां तो निघाला तोही मोठ्या मेटाकुटीनं ती अगदीं धरणंच धरून बसली. त्याला कारणंही तशीच होती. तिची तब्बेत हल्ली चांगली रहात नव्हती. वजन एकसारखं उतरत होतं. भूक लागत नव्हती. येता जातां डोकं दुखायचं आणि उदास वाटायचं. आपल्या घराचा, आपल्या साचेबंद आयुष्याचा, फार काय आपल्या संसाराचा तिला वीट आला होता—अगदीं शिसारी आली होती. तिला एकसारखी खंगत चाललेली पाहून अखेर नवऱ्यानं मुलींच्या शाळेची सुट्टी साधून रजा काढली होती आणि तो आपल्या कुटुंबासह इथं आला होता.

इथं तिला खुली हवा मिळाली—थंडगार वारं मिळालं—सोनेरी ऊन मिळालं—झऱ्याचं जिवंत पाणी मिळालं आणि तिच्या सगळ्या तक्रारी आपोआप बंद झाल्या. ती पोटभर जेवूंही लागली. अन्नाची तिला चव लागूं लागली. साधेच पण हरतऱ्हेचे पदार्थ ती नवऱ्याला अन् मुलींना करून घालूं लागली.

काल खुल्या हवेंत तर तिला अन्न कमालीचं रुचकर लागलं. जेवण आटोपून ती उठूनं उभी राहते ना राहते तोच……

ती जागच्या जागींच मंत्रमुग्ध होऊनं खिळून राहिली. दक्षिणेकडच्या डोंगरांवरून वाऱ्याच्या जोरदार झुळकी येतं होत्या. आंब्याच्या डहाळ्या गदगदून हालत होत्या. तळागतच्या सावल्याही थरथरत होत्या. तोंच त्या झुळकींसह एक विलक्षण वास दरवळत आला. हा वास आंब्याच्या मोहोराचा खात्रीनं नव्हता. त्यापेक्षांही उग्र, धारदार आणि उन्मत्त असा हा गंध होता. धुपाचा लोट धुमसत अंगावर चाल करून यावा तसा तो वास तिच्यावर आक्रमण करीत आला. तिच्या नाकांतून शिरला तो थेट उराच्या पाकळ्या फोडींतच ! असा एकाएकी, अकल्पितपणें घमघमत, काळजाला घरे पाडीत, उधळंत तो वास आला. हवेमधला बाष्पयुक्त उबदार-





अनुक्रमणिका

मनाही त्या सुवासानं पुलकित झाला. ऐन दुपारीं सूर्य डोक्यावर आला असतांना, जमीन तापून वाफा फेकूं लागली असतांना डोंगरावरच्या वाऱ्याच्या लाटेवर तरंगत तो वास आला. आंब्याच्या मोहोराचा थोंबट गोड नी कडू वास – काजूच्या मोहोराचा उग्र तुरट वास–करवंदीच्या फुलांचा सुगंधमधुर वास–छे, ह्या सर्व गंधांपेक्षां हा गंध कांहीं वेगळाच होता. त्या साऱ्या गंधांपेक्षांही ह्या गंधांतला आवेग जबरदस्त होता. कुठल्या मोहोराचा कीं कुठल्या फुलाचा हा वास होता कुणास ठाऊक! हा वास अलौकिक होता. ह्या वासांत एक जीव पिळवटून मोरलेली आणि भारून टाकणारी हाक होती.

खरकटा हात तसाच धरून ती तो डोंगरावरून आलेला दिव्य सुवास हुंगीत उभी राहिली. दीर्घ श्वासासरशी तो वास तिनं अवघ्या देहांत ओढून घेतला, रक्ताच्या थेंबाथेंबापर्यंत पोचूं दिला, शरीरांतली नसनूनस त्या गंधानुभूतीनं तिनं थरकूं दिली. ती स्वतःला विसरली, स्वतःच्या आयुष्याला विसरली आणि एका स्वर्गीय गंधाच्या वातावरणांत शुद्धबुद्ध हरपून सर्वस्वानं विलीन होऊन गेली. बघता बघता त्या गंधानं वेडी झाली, फणसाच्या पारावरून दडा दडा खालीं उतरली, पाया-खालची माती न् खडे तुडवीत डोंगराच्या दिशेनं धावूं लागली. आणि डोंगरावर नागमोडी वळणानं वरपर्यंत गेलेल्या पायवाटेनं थोडीशी चढण हि चढून गेली. तोंच जांभळीखालीं खेळणाऱ्या तिच्या धाकट्या लेकीनं तिला डोंगरावर धांवत जातांना पाहिलं आणि ती ओरडली, 'आईऽऽ, कुठं चाललीस तूं?' थोरली मुलगी तर तिच्या नवऱ्यालाच हांका मारीत सुटली, 'बाबा, अहो बाबा, आई बघा एकटीच कुठं निघाली'

मुलींच्या आरोळ्या कानांत शिरताच ती भानावर आली. इतकी कीं शिरमिरीनं ती तडक उलटी वळली आणि ज्या वाटेनं वर जाऊं पहात होती तीच वाट वेगानं उतरून खालीं आली. आपली तंद्री मोडल्या-बद्दल ती मुलींवर संतापली,

"कशाला ग ओरडत सुटलात? जरा धीर म्हणून नाहीं कार्ट्यांना. जरा आईला मोकळं सोडाल तर कांहीं बिघडेल का ग तुमचं?"

तिची मधली मुलगी फिसफिस हंसत म्हणाली, "पण अशी काय वेड्यासारखी धावत सुटली होतीस. कुठं चालली होतीस तूं?"

"डोंगरावर," ती निर्विकारपणं म्हणाली.

"आई, मी येते तुझ्या बरोबर," धाकटी उत्साहानं उडी मारून म्हणाली.

'पण आतां मी जातच नाहीं मुळी,' ती तुटकपणें उद्‌गारून हात धुवायला हौदावर गेली.

क्षणादोनक्षणांतच उफाळून आलेली ती ओढ मावळली होती. ती ओढ लावणारा तो गंध जिथून आला तिथंच परत निघून गेला होता. तिनं जोराजोरानं हवेंत हुंगून पाहिलं, पण तो गंध अचानक थमला तसाच हरवला होता. फिरून कांहीं केल्यां दरवळत नव्हता. खिन्न मनानं तिनं भांड्यांची आवराआवर केली आणि व्हरांड्यांत चटई टाकून ती आडवी झाली. दुपारची झोप घेऊन ती उठली तेव्हां तिला त्या वासाची आठवण झाली. ती लगबगीनं फणसाच्या पारावर येऊन उभी राहिली. आशेनं डोंगराकडे टक लावून पाहूं लागली. हवेंत हुंगून पाहूं लागली. पण तो गंध आला नाहीं. चहूंकडे जमीन तापली होती. आणि हवेंत निळ्या सुरकुत्या लाटा तरळत होत्या. सारा डोंगर दुपारच्या कडक उन्हांत उजाड आणि वैराण भासत होता.

मग मात्र तिनं दिवसभर त्या गंधाचा परत विचार केला नाहीं.

पण तिला उचंबळून टाकायला तो गंध परत आला होता. तिला आज कांहीं केल्या झोप येत नव्हती म्हणून ती झऱ्याकांठीं येऊन बसली होती. बंगल्याच्या व्हरांड्यांत नवरा आणि मुली गाढ झोपल्या होत्या. सूर्य मध्यावरून बराच कलला होता. हवेंतला ऊष्माही असह्य होत होता. गरम हवेवर उपाय म्हणून अखेर बंगल्यापलीकडच्या झऱ्याकडे ती आली. झऱ्याच्या आसपास कितीतरी काळे गुळगुळीत फत्तर होते. एका फत्तरावर येऊन ती बसली आणि मंद मंद खळखळत खडकांवरून खालीं उतरणाऱ्या गार जलाच्या धारेंत तिनं अलगदपणें पाय सोडून दिले. पाण्यावर उन्हाचे कवडसे चमकत होते आणि त्यांच्या प्रकाशांत पाण्यांत सळसळणाऱ्या इवल्याशा मासोळ्या सहजच दृष्टीला पडत होत्या. ओढ्याकांटच्या गवताच्या बेटांवर गुलाबी रंगाचे चतुर थरथरत होते आणि पलिकडच्या हिरवळीवर पिवळ्या रंगाची इवलीं इवलीं फुलपांखरं भिरभिरत होती. ती अनिमिष नेत्रांनीं आळीपाळीनं माझ्याकडे, चतुरांकडे आणि फुलपांखरांकडे पहात होती. निसर्गासह चाललेल्या त्यांच्या मुक्त क्रीडा मनांत साठवीत होती. डोंगरावरच्या दाट झाडींतून ह्या झऱ्याचा उगम झाला होता. झाडांवर वाढलेल्या, खालीं लोंबणाऱ्या लवचिक वेली झऱ्यावर तरंगत होत्या. झऱ्याच्या उगमाकडे एक प्रकारचा थंड, रहस्यमय काळोख दाटला होता. तिला क्षणभर त्या काळोखांत शिरावेंसें वाटलें. ती उठली आणि एका खडकावरून दुसऱ्या खडकावर हलके हलके पाऊल टाकीत झाडींत घुसूं लागली. अचानक एका खडकावर गंभीर बैठक मारून बसलेल्या भल्या थोरल्या पिवळ्याधम्म बेडकाकडे तिचं लक्ष गेलं. त्याच्याकडे पाहतांच ती खुदकन हंसली. तिच्या हंसण्याचा आवाज ऐकून त्या बेडकानं दचकून डुबी घेतली. आणि वर उसळलें पाणी तिच्या अंगावर उडलं. त्यासरशी झाडींत दडून बसलेला एक पांढऱ्या करड्या रंगाचा पक्षी पंख फडफडवीत तिच्या अंगावरून निघून गेला. त्याच्या पंखाचा वारादेखील तिच्या अंगावर लहरत आला. ती तिथंच थबकली. त्या ठिकाणीं पाण्याचं लहानसं तळंच झालं होतं. ती त्या तळ्यांत चटकन उतरली आणि भराभरा तें पाणी तोंडावर मारून घेऊं लागली. त्या ठिकाणच्या निःशब्द शांततेनें, निर्जन एकांतानं ती उल्हसित झाली होती. पाण्यांत उभी राहून ती वर दाट होत गेलेल्या झाडीकडे, त्या झाडीभोंवती दाटलेल्या गार काळोखाकडे पहात राहिली...तोंच तो वास दरवळला. झऱ्यावरच्या ओल्यागार वातावरणांत तो वास तिरा-सारखा घुसला. तिचं मन कालच्यासारखंच मोहित झालं आणि शरीर रोमांचित होऊन उठलं. तो वास जणूं तिला हलकेंच स्पर्श करीत होता, तिच्या मानेवर नी गालांवर फुंकर घालीत होता आणि तिच्या कानांत कुजबुजत होता, 'ये–ये–माझ्याजवळ ये–मला हुडकून काढ–मी कांहीं दूर नाहीं–जंवळच आहे–तूं शोधायचाच काय तो अवकाश आहे. ये ना–येतेस? येशील? आत्तां–ह्या क्षणीं–चल ऊठ–धांवत सूट–' ती उभ्याउभ्याच थरथर कापूं लागली–तिचे ओठ उत्कंठेनं विलग होऊन कंप पावूं लागले–नाकाच्या पाकळ्या स्फुरूं लागल्या–पापण्या लवलवूं लागल्या–तिचं कपाळ एकाएकी जड झालं–कानशीलं बधीर झाली. अशी अवस्था तिनं कधींच अनुभवली नव्हती. असा व्याकुळ करून सोडणारा उन्माद तिच्या अंगांत आणि






हृदयांत कधींच संचरला नव्हता. ती बेभान होऊन खडकांवरून अडखळत, ठेचाळत वर धावत सुटली. एखाद्या नागिणीसारखी फुंफाटत झांडींत घुसली. हातानं फांद्या बाजूला करीत वरवर चढूं लागली. तिचा पदर झाडींत अडकून टरकन् फाटलासुद्धां. कांहीं फांद्यांच्या काट्यांनीं तिच्या दंडांना ओरखाडे काढले. तिचे केस काटक्यांत अडकून अंबाड्यांतून तुटून बाहेर पडले. वाळलेल्या गवतांतलीं कुसं तिच्या साडींत भसाभसा घुसत होती, पायांना बोचत होती. पण तिचं कशाकडे लक्षच नव्हतं. तिच्या अंतःकरणांत एकच विचार थैमान घालीत होता. हा वास कुठून येतोय ? कशाचा हा वास ? हा शोधलाच पाहिजे ! हा वास आत्तां हुडकून काढलाच पाहिजे. ह्या एकाच विचारनं ती पायाखाली डोंगर तुडवीत पुढं पुढं चालली होती. एखादं धुळीचं जोरदार वादळ गरागरा फिरत सरकत जावं तसा तो वास हवेंतून प्रवास करीत अधिकाधिक दरवळत येत होता. तिला त्या गंधाकडे जायलाच हवं होतं. हा गंध कुठल्या झाडाचा, कुठल्या फुलाचा कीं मोहोराचं हें तिला अजुन माहीत नव्हतं. तरी देखील त्या गंधाच्या जाणीवेनं ती अशी अनिर्बंध धावत सुटली होती. जणु तो गंध तिचाच होता. आजपर्यंत हरवला होता आणि आता तिला सांपडला होता. कुठंतरी, कधींतरी हा गंध तिनं हुंगला होता—कदाचित् नव्हताही ! तरीही हा गंध तिच्या ओळखीचा होता. हा गंध तिला परका नव्हता. ह्या गंधाला भेटणं म्हणजे स्वतःच्या घरीं जाण्यासारखंच होतं.

ती उन्मनस्क होऊन चढतच राहिली. एकाएकी एका प्रचंड खडकाची पाठ तिच्या वाटेंत आडवी आली. पुढं जायला रस्ताच नव्हता. हा सरळच्या सरळ उंच खडक चढूनच पलीकडे जायला हवं होतं. तिनं वर मान करून पाहिलं. त्या खडकावर फक्त निवडुंगाचीं मोजकींच खुरटीं झाडं उगवलेली होती. खडकावरून झऱ्याची बारीक धार झिरपत होती. हा खडक चढण्याचं सामर्थ्य तिच्या पायांत नव्हतं. वर चढायला कुठं सोपी वाट गवसते का हें ती शोधूं लागली. पण तशी वाटं कुठंच दिसेना.

—आणि तेवढ्यांत तो वासच यायचा बंद झाला. तो वास हरवला आणि तिच्या पायातलं सामर्थ्य गळून पडलं. अंगांतलं सारं त्राण संपल्याप्रमाणें हताश नि शिथिल होऊन ती त्या कड्यांखालीं उभी राहिली. रखडत रखडत कशीबशी ती खालीं उतरली. तिला पहाताच तिची धाकटी मुलगी आनंदानं ओरडली, 'आई आली, आई आऽऽली.' तिला आसपास हुडकत असलेला तिचा नवरा आश्चर्यानं आ वासून तिच्याकडे पहातच राहिला.

'अग गेली होतीस कुठं ? अन् हा काय अवतार करून घेतलंयस ? कशाला गेली होतीस वर काट्याकुट्यांत कडमडायला ? आम्ही केव्हांपासून तुला शोधतोय. चहा नाहीं का करायचा ? '

' अहो बाबा, ही कालसुद्धां अशीच डोंगरावर जायला पहात होती, ' तिची मधली मुलगी आपल्या वडिलांना म्हणाली.

फक्त तिची मोठी मुलगी मात्र तिच्याकडे कुतुहलानं आणि कौतुकानं टक लावून पहात स्तब्ध उभी राहिली.

ती मुकाट्यानं चहा करायला घरांत गेली. चहा करा—खायला करा—न् सदा ह्यांच्यासाठीं अडकून बसा—तिचं मन आंतल्या-आंत फणफणत राहिलं. शून्य मनानं नी जड हातांनीं तिनं कसा बसा चहा केला. तिला चहा देखील घ्यावासा वाटत नव्हता.

—श्रीराम कामत





**दोन** दिवसाच्या वादळांत दाजी गात्र-राच्या घरावरचा इमारत मुळासकट उसटला होता. खळनाथाची इच्छा असती तर विराट आम्रवृक्षाचा तो अवजड विस्तार बामणाच्या घरावर कुठल्याहि क्षणीं सपाट कोसळता—

धर्म्या रुद्याच्या हें प्रथम लक्षांत गेलं. नाही तरी त्याला धंदा नव्हताच. हें तें, इकडे तिकडे करून गिऱ्हाइकं शोधत तो गांवांत भटके. तेव्हां या असल्या गोष्टी इतरांपेक्षां त्याच्या जरा आधीं लक्षांत येत.

धर्म्या सरळ वाटेनं जात होता. तर त्याचं लक्ष गेलं. आणि तसा लेकाचा थांबला. म्हणजे पाऊलच उचलेना. पापण्या फाडून बारीक डोळ्यानं तो बघूं लागला. पक्की खात्री करून घेतलीन् आणि तशी त्यानं साद घातली, ‘ दाजी अहो दाजी ’—

बाहेरच्या खोलींत ‘ नामदेवाच्या अभंगां’त डोकं खुपसून दाजी बसला होता. वर कांचेतून काय उजेड येई तोच ! बाकी खोलींत यायला उजेडाला



मुळी वाव नव्हता. त्या अर्धवट प्रकाशांत दाजीला अक्षरं कशीं लागत तोच जाणे. जाड भिंगाचा चष्मा लावून पुस्तक अगदीं डोळ्याजवळ घेऊन मोठ्यानं वाचायची त्याला संवय होती. बघणारे हंसत, चेष्टा करीत. म्हणत—आतां म्हातारपणी-सुद्धां याचा अभ्यास चालूच आहे !

साद एकली आणि तसा डोईचा मफलर नीट गुंडाळीत दाजी बाहेर आला.

'रुद्या तूं रे' दाजीनं विचारलं.

'रवळनाथाची कृपा, दाजी.' धर्म्यानं सलामी दिली.

'त्याच्याच कृपेनं सारं चाललं आहे, चालतं आहे रे !'

'खरं !' धर्म्यानं नंदीबैलासारखी मान हलवली.

'पटलं ना ? मग जा चल, नीघ कसा !' कुत्र्याच्या अंगावर यावं तसा दाजी खेकसला.

'दाजी, आतां हें पटलं नसतं तर मुद्दामहून साद घातली असती होय ? बरोबर टायमाला उभा झालों का नाहीं बघा ? आं ! काय ?'

'बरोबर काय ? आणि शिंदळीच्या तुझा टाइम रे कसला ?' दाजी नाबरानं डाफरलं.

धर्म्यानं अजीजीच्या सुरांत म्हटलं, 'दाजी'—

'बोल.'

'तुमच्या घरावर हा जो इमारत आहे... काय ?'

'तो तुला आजच दिसला होय रे रुद्या ? खूप जुनं झाड आहे. शें–दीडशें वर्षं तरी खरी ! आमच्या खापरपणजोबांची ही कामगिरी. सोहिरोबा नांव त्यांचं. अठराव्या शतकाच्या सुरवातीच्या काळांतील ही व्यक्ति गांवठी झाडावर मालदेसचं कलम केलं असावं. माझा आपला तर्क. निश्चित पुरावा नाहीं. तेव्हांपासून नाबराचं घर या आम्रवृक्षाच्या सावलींत वाढलं. मोठं झालं—'

'तोडून टाका तो ! काय ?'

'आं !'

'घर महत्त्वाचं का हें झाड, दाजी ?'

'काय अकलेचा प्रश्न विचारलास रे रुद्या ?'

'प्रश्न साधाच. फक्त उत्तर द्या ! काय ?'

'अर्थात् घर.'

'म्हणजे हें ठरलं म्हणा कीं ! तेव्हढं मोबदल्याचं बोला चटपट. फुकट टायम जायला नको—काय ?'

'अरे, ठरलं काय धर्म्या ?'

'झाड तोडायचं. दुसरं काय ? आडवी तोड मारतों. कसं ?'

'कां—कां ? आणि मी विचारतों ही गोष्ट कोणी अन् केव्हां ठरवली ? अरे, एवढा हा दाजी नाबर इथं अजून उभा आहे. मालक तो. निदान त्याचा तरी विचार घ्या. परस्पर ठरवूं नका—' दाजी नाबर हातवारे करीत उसळला.

'असं काय करतां दाजी ?'

'म्हणजे मीच वाईट ! तुम्ही लोकं तिकडे वाटेल तें ठरवतां, अखेरपर्यंत—'

'अहो, नीट बघा कीं ! दिसत नाहीं तर ती चाळिशी लावा तुमची. काय ? हा—हा इमारत मुळांतून असा उफराटा उचललाय. कधींची कोसळेल—काय नेम नाहीं. आणि येणार तो उभा घरावर—अहो तुमच्याच. दुसऱ्या कुणाचं घर जवळसुद्धां नाहीं. काय ?—'

'हात् गाढवा ! असं होईलच कसं ?' दाजीनं अचंब्यानं विचारलं.

'होय ! तें तसंच होणार ! पैज आपली.'

'पैजेची गोष्ट नाहीं ! हा तत्त्वाचा प्रश्न आहे. श्रद्धेचा प्रश्न आहे. नाबराच्या घराचा महापुरुष बसून आहे तिकडे उंच, ह्या आंब्याच्या झाडावर. त्याला अधिक काळजी कीं शिंदळीच्या तुला रे ?' दाजी नाबर चवताळून ओरडला.

'नाहीं म्हणजे तुमचा हा पाइंट बरोबर आहे बघा दाजी.' धर्म्यानं वरमून म्हटलं, 'आमची अक्कल आपली चालू—काय ?'

'आतां त्याच्याच मनांत हें असं कांहीं आलं तर—' दाजी आतां स्वतःशीच बोलत होता. विचारांत गुंतला होता.

'माझंवी बरोबर हेंच म्हणणं—काय ?'

'तर—तर ऐक ! एकदां सांगतों, फिरून वाच्यता नाहीं होणार...जास्तीत जास्त काय होईल रे ? हें घर मातीला मिळेल, दाजी नाबराचा कपाळमोक्ष होईल.'

'छाः छाः !'

'होऊं दे ! खुशाल होऊं दे ! हा त्याच्या मर्जीचा प्रश्न ! त्याला पंचाइती-आपणाला फिकीर करायचं कारण नाहीं.'

'मग हें आधीं नाहीं सांगायचं ? मोफत टायम खाल्लात माझा.' धर्म्या रुद्यानं नाराजीनं म्हटलं. हात झाडले. आंब्याच्या झाडाकडे बघत तो पचकन् थुंकला आणि तसा मग खवट आवाजांत म्हणाला, 'दाजी एक सांगू ? शहाणा माणूस घरावर झाड वाढूं देत नाहीं.'

तसा दाजी नाबर आणिकच उसळला. म्हणाला, 'आतां रुद्या, हे तूं मला शिकव. आमच्या वाडवडिलांपेक्षां भडव्या तूं अधिक शहाणा !'

'बोललों ही चूक खरी ! पण न बोलतो तर मोठी चूक झाली असती दाजी. काय ?'

'आतां आल्यावाटेनं सरळ जातोस का हव्यात दोन थोबाडींत ?'

'नको-नको ! म्हणजे थोतरींत नकोत. चायपाण्याला कायबाय देणार असाल तर ना नाहीं दाजी.'



अनुक्रमणिका

'खुळा का काय —'

'मी ? आहेच ! गावांत सगळे असं म्हणतात आणि वर तिच्या मायला, हे अस्से हंसत सुटतात हो ! आपण नाहीं बा लक्ष देत.' धर्म्या रुद्यानं मान झटकत म्हटलं.

'दुसरं तरी काय करणार तूं ?'

'आमची कारभारीण गांव नासवते अशी यांची तक्रार-काय ?'

'कोणं ? सावित्री ?

'तीच रांड ? आणि गांवाच्या तक्रारींत बी तथ्य आहे. हा धर्मा खोटं नाय बोलणार. पण दाजी तुम्हीच सांगा ही गोष्ट काय मला ठाऊक नाहीं ?'

'पण बायको नवऱ्याच्याच ताब्यांत हवी.'

'हवी म्हणजे काय बिलकुल हवीच ! मी कुठं नाहीं म्हणतों. पण एकाद्याची नाहीं ताब्यांत रहात. मग हो ?'

'नाहीं रहात म्हणजे ? पुरुषासारखा पुरुष तूं ! यःकश्चित लग्नाची बायको धाकांत ठेवतां येत नाहीं तुला ? रुद्या, विश्वास नाहीं बसत,' दाजी नाबरानं मत दिलं.

धर्म्यानं कांबळं झटकलं. कुऱ्हाड उचलली. वाढलेली हजामत खाजवीत तो मुकाट वाटेला लागला. पण मग त्याच्या मनांत कांहीं आलं. तो मागं फिरला. हंसत लाचारीनं म्हणाला, 'दाजी, महापुरुषावरील तुमची भक्ति तुम्हाला झाड तोडूं देत नाहीं. पोरीवरचं माझं प्रेम त्या सटवीवर मला हात टाकूं देत नाहीं. एकूण काय ? एकच हःहःहाःहाः......'

'धर्म्या पोरं किती रे तुला ?' दाजी नाबरानं न राहवून विचारलं. का कोण जाणे ? म्हाताऱ्याला एकाएकी त्याची दया आली. कळवळा आला. त्याची विचारपूस करावीसं वाटलं.

'पोरं नाहीं, लेकरं म्हणा दाजी.' तो डिवचल्यागत होऊन म्हणाला, 'अजून जिवन्त आहे मी. काय ? आता गांवात लोक कांहीं म्हणोत. एकच लेक मला. असेल आठदहा वर्षांची. पण रवळनाथाची कृपा ! पोर भारी गोड हो. हां ! बिलकुल गुणाची ! उभ्या जगांत धर्म्यावर प्रेम करणारी तीच. काय ? बाकी सगळा उच्छाद– नुसता उच्छाद ! आणि तरीसुद्धां जीव द्यावासा वाटत नाहीं मला दाजी. हीच तर मोठी गंमत !'

'धर्म्यानं निश्वास टाकला. खाली मान घालून तो उभा होता. लाचारासारखा, अजागळासारखा. त्याच्या कळाहीन, नालायक जीवनाला जसा मुळीं अर्थच नव्हता. खरं म्हणजे त्यानं कधींच मरायला हवं होतं. तेंच योग्य झालं असतं. आणि हें त्यालासुद्धां माहीत होतं.

'दाजी,' धर्म्या खालच्या आवाजांत म्हणाला, 'अहो दाजी, महापुरुषाच्या कृपेनं या आंब्याच्या झाडाला धास्ती नाहीं. अगदीं भक्कम, मजबूत आहे तें. काय ? खोटं बोललों मी. काम मिळावं म्हणून. काय ? माफ करा.'

आणि पाठ फिरवून तो चालूं लागला. त्याला स्वतःची लाज झाली होती. आपल्या लाचार खोटेपणाची शरम वाटत होती.

पण दाजी नाबरानं त्याला जाऊं दिलं नाहीं. अडवलं, हाताला धरून मागं खेचलं आणि दमांत म्हटलं, 'शिंदळीचा सरळ निघाला.'

'मला जाऊं द्या दाजी.'

'जाऊं देऊं ? असा हात हलवीत ? आणि घरीं जाऊन लेकीला काय सांगणार आहेस रे ? मलाच देशील शिव्या ! म्हणशील दाजी नाबर माणूस नाहीं. गावांत लोकं एक म्हणतातच—'

'शहाणा खुळा.' धर्म्यानं दाजीचं वाक्य पूर्ण केलं.

'थोबाड फोडून टाकीन,' दाजी चवताळला. हात उगारून पुढं झाला.

'मी नाहीं. गांवांत लोकं असं म्हणतात दाजी.'

'म्हणणारच ! माझं शहाणपण कळण्याची कुवत नाहीं या गाढवांची तेव्हां त्यांना ते खुळेपणाचं वाटणारच. एकजात नालायक लेकाचे. स्वार्थ दिसत नाहीं, परतं सुचत नाहीं. व्यवहार–फक्त व्यवहार ! या व्यवहारापायीं हे स्वतः तर जातीलच खड्ड्यांत ! पण दुसऱ्यांनाही ओढत नेतील बरोबर.' दाजी नाबर वैतागानं, उद्वेगानं म्हणाला.

'आपल्या करणीनंच जाणार असतील तर जाईनात का ! आपण काय करणार ? नाहींतरी खड्डे खणून ठेवलेच आहेत तुम्हीं.' धर्म्यानं सांगितलं.

आणि यावर दाजी नाबर मोठ्यानं हंसला. अगदीं मनापासून. म्हणजे धर्म्याचा हा विनोद त्याला एकदम पसंत पडला. इतका कीं हंसूं आवरेनाच. पुरेवाट झाली म्हाताऱ्याची.

'होय, होय ! खणून ठेवलेत खड्डे.' दाजी हंसत हंसत सांगूं लागला. 'पण त्यांच्यासाठीं नाहीं धर्म्या ! माझ्या हपूसच्या कलमांसाठीं. अरे दहा पांच वर्षांत समोरच्या या डोंगरावर अशी गर्द हिरवीगार आमराई उठवून देतों कीं तोंडांत बोट घालून गांव नवल करीत उभं राहिलं पाहिजे. हां !'

म्हातारा ऐन रंगांत आला होता. डोळ्यावर हात घेऊन, मान उंचावून तो बघूं लागला. समोर, दूर तिकडे, उगवतीकडे ! त्याच्या अधु दृष्टींत सगळाच धूर भरला होता. धुकं वरवर उठत होतं. शुभ्र धवल कबुतरं थव्याथव्यांनीं झेंपावत होतीं. आणि डोळे दुखत होते, पाणावत होते.

पण चाळिशी लावायची बुद्धी कांहीं दाजी नाबराला झाली नाहीं. शुद्धींत असेल तर ना ! म्हातारा भलावण दुनियेंत वावरत होता. देहभान विसरून स्वप्नछंदांत दंग होता. अंतर्मनाची अस्मिता सुखवीत अन् जागवीत होता.

'पण लोकं म्हणतात—' धर्म्या रुद्यानं भीतभीत आवाज काढला.

'लोकांचं मला सांगूं नकोस !' दाजी नाबर खालीं जमिनीवर उतरायला इतक्यांतच तयार नव्हता.

'नाहीं, तसं सगळंच सांगत नाहीं. पण लोकांना कोणाचं बरं नको दाजी. काय ? तीं म्हणतात, डोंगरावर कलमं जगणार नाहींत. जमीन मुरुमाची नाहीं, भिडाची आहे, भिडाची! काय ?'

'आतां हें मला माहीत नाहीं ? अभ्यास केला आहे मी. खूप संशोधन केलंय्. तेव्हां या विषयावर बोलायचा अधिकार मला आणि एकट्या मलाच ! काय समजलास ?'

'आतां मला हो काय समजतं यांत ?'

'मी शिकवीन ! आहेस तयार.—'

'नको दाजी ! अधिक ज्ञान कामाचं नाहीं म्हणतात.'

'कामालाच ठेवून घेतों तुला. कायमचा.'

'आं !' धर्म्याचं तोंड साफ उघडं पडलं. म्हणजे त्याला कल्पना नव्हती. दाजी नाबराची ही सूचना नक्कीच विचार करण्याजोगी होती.

'फक्त या खड्ड्यांत पाणी घाल. तें एकच काम तुला.'

'पण दाजी पाणी--पाणी आहे कुठं डोंगरावर ?'

'तो तुझा प्रश्न !' दाजीनं जाब केला. 'तुझा तूं सोडवायचा.'

'मोठाच प्रश्न आहे हो !' धर्म्या रुद्रे टाळकं खाजवूं लागला. पुटपुटला, आतां हिथं रानउतारावर तुमच्या खड्ड्यांना काय कमी जागा होती ? पाणीबी ढेंप, कसं जवळपास. काय ? पण दाजी तुम्हाला हवा झाला डोंगरच-तो भस्माचा डोंगर.'





'भस्माचा नव्हे. भीष्माचा डोंगर.' दाजी नावरानं त्याची चूक सुधारली.

'भीष्माचा काय आणि भस्माचा काय- पण डोंगरच ना! आं! गावाला त्याचा काय उपयोग आहे हो? फुकट जागा अडवून पासला पडला आहे. मुडदा कसा! भातशेती राहूं द्या, पण गुरं चरायला घालूं म्हटलं तर कराडही उगवत नाहीं या मातीमसणांत?

'धर्म्या, अरे असं बोलूं नये. ती आहे महापराक्रमी भीष्माची मृत्युशय्या! होय, आजासाठीं अर्जुनानं खास तयार केलेली शरशय्या ती हीच बरं! तिच्यावरच भीष्माचा अंत झाला. केव्हढं भाग्य आपलं! म्हणूनच आपल्या या गांवाला महाभारताचा हा ऐतिहासिक वारसा लाभला! माझ्या 'बलवंतां'तील लेखांत मी हें सगळं साधार सिद्ध केलं आहे. पुण्या-मुंबईच्या विद्वानांनासुद्धां कुठं चूक दाखवतां आली नाहीं.'

हा असा दाजी नावर पुन्हा कुठंतरी पुस्तकांत आणि पुराणांत बुडूं लागला. आणि तसा धर्म्याचा जीव टांगेला लागला. म्हणजे नेम नव्हता. दाजीनं हें एकदां असं चऱ्हाट लावलं कीं मुद्दा बाजूलाच राहील. म्हणजे हें कामाचं विसरूनच जायचा म्हातारा!

म्हणुन धर्म्यानं त्याला मध्येंच रोखला. सांगितलं, ' दाजी, म्हणजे हें ठरलं बरं का?' दोंगारीच येतों. कसं?'

'कशाला रे शिंदळीच्या?' दाजी रागावला. बोलण्यांत व्यत्यय आलेला त्याला खपला नाहीं. धर्म्याची भीती खरी होती! मारक्या ढोरासारखे डोळे वटारून दाजीनं पाहिलं आणि तसा हळुहळू तो ठिकाणावर आला. थंड झाला. या धर्म्या रुद्याला आपण कामाला बोलावलं आहे याची त्याला आठवण झाली. मोकळेपणानं हंसत दाजीनं म्हटलं, 'ये जरूर ये! वाट बघतों आहे. खोटी करूं नकोस.'

'खोटी नाहीं होणार! आहेच बघा मी- भस्माच्या डोंगरावर. तुमच्या आधींच! काय?'

'भस्माच्या नाहीं भीष्माच्या' दाजीनं त्याला पुन्हा बजावलं. जा, घोकत जा! पुन्हा चूक झाली तर याद राख! केव्हढी अभिमानाची गोष्ट! पण हराम कोणाला काय वाटत असेल तर! हूं! एकजात शिंदळीचे नालायक!'

'भीष्माचा,' 'भीष्माचा' असा मोठ्यानं जप करीतच धर्म्या वाटेला लागला.

फाटकावर दाजी नावर मोठ्या अभिमानानं ऐकत उभा होता. त्याला त्यांतच समाधान!

## २

**गांवांत** लोकं म्हणत नसल्या शहाणपणापायीं दाजी नावरानं आपल्या सोन्यासारख्या आयुष्याची माती केली. त्या काळांतला मॅट्रिक हा! चांगला कराचीला का कुठं कस्टमांत चाकरीला होता. परमुलखांत एकटाच पडला. तर एकाएकी दुर्बुद्धि झाली. झक् मारलं हें पुस्तकांचं व्यसन लावून बसला! आतां व्यसन म्हटलं कीं तें वाईटच! आणि त्यांतून वाचण्या लिहिण्याचं व्यसन सगळ्यांत महाभयंकर! त्यापेक्षां दारू खूप बरी! म्हणजे होतं काय? ही झिंग एकदां चढली कीं मुळीं उतरतच नाहीं. माथं कायमचं फिरतं. माणूस कामांतून पार गेलाच! त्याला वाटतं दुनियेंत शहाणा एकटा मी! कळतं काय तें फक्त मला! म्हणून मी म्हणेन तें ब्रह्मवाक्य!

तसं नसतं तर दाजी नावरानं वरच्या अधिकाऱ्याबरोबर पटवून घेतलं असतं. निदान

...पान ४७ वर










मनाच्या पारूवर/रंगून
अ र विं दा : रा ग भि र

कुलाब्यापासून कल्याणपर्यंत भटकत होता, ओळखीदेखीचीं, नात्यागोत्यांचीं, मित्रमंडळींचीं-सगळ्यांचीं बिऱ्हाडें आणि मकाणें पालथीं घालीत होता. पण हीं सगळीं ठिकाणें माणसांनीं, पोराटोरांनीं, पेइंगगेस्टांनीं तुडुंब भरलीं होतीं. आठ-दहा फुटांची, चार भिंती आणि वर छप्पर असलेली-दोन माणसांच्या बिऱ्हाडापुरती जागा कुठेंहि दिसत नव्हती.

लग्नाच्या दुसऱ्याच रात्रीं अरविंदापुढें जागेची ही विवंचना उभी राहिली होती. वास्तविक लग्नानंतर किमान दोन वर्षें तरी मजेंत संसार करतां येईल अशी एक छान जागा अरविन्दा-कडे चालून आली होती. अरविंदाच्या मित्राचा मामा दोन वर्षांची स्कॉलर्शिप मिळवून इंग्लं-डला जात होता आणि तो परत येईपर्यंत त्याची माहीमची जागा अरविंदाला मिळत होती. आणि ज्या दिवशीं ती ताब्यांत येणार होती त्याच्या आदल्याच दिवसाचा मुहूर्त अरविं-दानें पकडला होता. ठरल्याप्रमाणें निर्विघ्नपणें लग्न पार पडलें, दुसऱ्या दिवशीं सुनंदाला घेऊन त्यानें संसाराला लागणाऱ्या किमान वस्तूंची खरेदी केली, सगळी जमवाजमव केली आणि ट्रकमध्यें तें सामान घालून उद्यां सकाळीं माहीमच्या त्या जागेंत जायचें, तर अरविं-दाच्या त्या मित्रानें येऊन सांगितलें, " मामाचं इंग्लंडला जाणं रद्द झालं. दिल्लीहून आजं तार आली, स्कॉलर्शिप तूर्त रद्द झाल्याबद्दल..."

तें ऐकतां ऐकतां अरविंदाचे कान हळूहळू बहिरे झाले. आपण काय जेवलों हें त्याला कळलें नाहीं. मित्र गेला केव्हां तें समजलें नाहीं. त्याही स्थितींत सुनंदानें त्याला बाहेर काढलें, त्याची समजूत घातली, आणि उद्यांचें उद्यां पाहूं म्हणून रात्रीं बाराला त्याला पेइंगगेस्ट म्हणून तो राहत होता तिथें आणून सोडलें. रात्रभर तो नुसता तडफडत, जळफळत होता. पिसाटल्यासारखें मन मुंबईच्या कोनाकोपऱ्यांतून दहाबारा फुटाचा आसरा शोधीत होतें....

निश्चयाचें बळ एकवटून सकाळीं साडे-सातला तो सुनंदाच्या माहेरीं आला, आणि तिला घेऊन बाहेर पडला. रस्त्यात सुनंदानें विचारलें, " मग आतां काय करायचं ठरवलंत ? "

एका रात्रींत 'ठरवलंस'चें 'ठरवलंत' झालें होतें. खोलीचा विषय काढून सुरुवातीलाच अरविंदा बेरंग करील या भीतीनें, अगदीं ठरवूनच तिनें एकत्र आल्याबरोबर ही गंमत बाहेर काढली होती.

त्यानें विचारलें, " हें केव्हां ठरवलंस ? "

" त्यांत काय ठरवायचं ? आतां काय 'अरे अरु' म्हणायचं. ? " आणि मिश्किल नजरेनं हळूंच एकदां त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, " आतां आमचा अरविंदा म्हणजे पुरुष झाला ना ? आणि ज्या माणसांत आपण



अनुक्रमणिका

राहतों त्यांचे रीतिरिवाज पाळायला हवेत ना !"

" पण आपण राहतों कुठं ?"

दोघेहि अभावितपणें हंसलीं, आणि त्या प्रश्नानें मूळ पदावर आलीं-राहायचं कुठं ?

अर्धा-पाहुण तास त्यांनीं हॉटेलच्या फॅमिली रूममध्यें काढला. पावसानें झोडपलेलीं पांखरें वळचणीला बसून राहतात तशीं तीं बसलीं होतीं. लग्नाचे कपडे, नवी हुरहूर, नाकांत भरणारा मुसमुसत्या तारुण्याचा सुगंध...

'मग आतां पुढं काय ?' अखेर त्यानें विचारलें.

'आतां आजपासून जागेच्या खटपटीला लागायचं. तिथपर्यंत गेलीं दोन वर्षं चाललंय असंच चालवायचं—'

'तूं कोंडवाड्यांत आणि मी जंगलांत—'

'चिडून कसं भागेल असं ?'

'मग काय करूं ?' वैतागून तो म्हणाला. 'एकहि गोष्ट आयुष्यांत सरळ होत नाहीं—'

पटकन् वाट सापडल्यासारखी ती म्हणाली, 'असं कां म्हणतोस ? बायको मनासारखी नाहीं मिळाली ?'

पण तिच्या अपेक्षेप्रमाणें त्याला हंसूं आलें नाहीं. डोक्यावरची अडचणीची टांगती तरवार त्याला विसरतां येत नसे. लग्नापूर्वी गेलीं दोन वर्षं ती हें पाहत आली होती. जरा कांहीं बिनसलें कीं तो बिथरायचा. दोन दोन दिवस डोक्यांत राख घालून बसायचा आणि आतां तर काय, लग्नाच्या दुसऱ्याच दिवशीं संसार उघड्यावर येऊन पडला होता.

'असं कसं म्हणतोस ?' त्याची समजूत घालण्यासाठीं ती म्हणाली, 'खारच्या हाउसिंग सोसायटींत साडेतीन हजार रुपये भरलेयस ना ?'

'ती कधीं बांधून होईल तेव्हां—वर्ष काय नि दोन वर्षं काय—'

'आपलं दैव चांगलं असलं तर—'

'चांगलं असलं तर ! तेंच म्हणतों मी !'

'पण हें दुर्दैवसुद्धां असंच कायम राहील असं कां धरून चालतोस तूं ? इतकीं वर्षं गरिबींत राहून स्वतःचं शिक्षण केलंस बी. काम्. झालास. दोन्हीं बहिणींचीं लग्नं केलींस, हें काय थोडं झालं ?' याच कर्तबगारीनं हेंहि पालटतां येईल...'

तिनें त्याला हसवण्याचा किती प्रयत्न केला. पण तो त्या दुर्दैवाच्या वर्तुळांतून बाहेर पडायला तयार नव्हता. पिळवटून पिळवटून



निराशेची चौकट कुरतडीत होता. तिला वाटलें, त्याचें मस्तक कुशींत घ्यावें आणि त्याचें सर्व दुःख शोषून घ्यावें......

दोन वर्षांपूर्वी अरविंदाच्या बहिणीच्या लग्नांत तिची त्याच्याशीं ओळख झाली. त्याचा सरळ स्वभाव, त्याची धडपड, त्याचा स्वाभिमान आणि त्याचें दुर्दैव या सगळ्यांचें चित्र त्या लग्नाच्या मांडवांत तिच्या मनांत उभें राहिलें. तिला तें आवडलें. तिचा जीव त्याच्यांत गुंतून पडला. ती ओळख तिनेंच वाढविली. ती श्रीमंत बापाची थाकटी लेक होती. लौकिक दृष्टीनें त्याची जात, त्याचें दारिद्र्य आड येत होतें. पण आईबापांचा विरोध तिनें धाब्यावर बसवला. केवळ तिच्या निग्रहापुढें पड खाऊन लोकलज्जेस्तव त्यांनीं तिचें लग्न लावून दिलें होतें. पण पैसा असूनहि पांच तोळे सोन्याखेरीज जावयाच्या हातावर त्यांनीं कांहीं ठेवलें नाहीं. तिच्या दोन्ही बहिणींना पांच-पांच हजारांचा नुसता हुंडा दिला होता. सुनंदालाहि ते म्हणत होते, 'या माणसाला सोडून तूं चांगल्या मुलाशीं लग्न कर. दहा हजार नुसता हुंडा देतो.'

पण सुनंदानें तें मानलें नाहीं. तो राग धरून सूड घेतल्यासारखे आईवडील तिच्याशीं वागत होते. खोलीची अकस्मात् उपटलेली अडचण त्यांना कळली होती. म्हणते तर तिचे वडील चुटकीसरशीं खोलीचा प्रश्न सोडवूं शकले असते. पण एका शब्दानेंहि त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. प्रत्येक कृतींतून ते एकच गोष्ट तिच्या कपाळावर मारीत होते—पैशाकडे पाहून तूं लग्न केलें नाहींस ना ? मग आतां तुझं तूं पहा !

दुपारी सुनंदाला सोडून अरविंदानें खोलीच्या शोधासाठीं तीनचार ठिकाणें धुंडाळून पाहिलीं. लग्नापुरती एक आठवड्याची काढलेली त्याची रजाहि आतां दोनच दिवस उरली होती. म्हणूनच जाईल तिथें नि भेटेल त्याला तो तेंच एक सांगत होता–कुठें तरी जागा असली तर पहा...!

संध्याकाळीं ठरल्याप्रमाणें सुनंदानें चर्चगेट स्टेशनवर त्याला गाठलें तेव्हां तो कमालीचा त्रस्त होऊन गेला होता. घामानें सगळें अंग झिरपत होतें. शर्टाची पाठ भिजली होती. पुढचा बहुतेक भाग पँटच्या बाहेर आला होता. पाठी-पोटावर शर्टाचा बोंगा झाला होता. आणि घामाच्या धारा हातानेंच निपटीत तो वेंगरुळपणें उभा होता.

त्याला हा अवतार पाहून सुनंदा म्हणाली, 'आतां मात्र खरा संसारी पुरुष दिसतोस ! तुझ्याकडे पाहून आपला संसार कसा होईल याची आतां काळजी राहिली नाहीं !'

तो चिडचिडत म्हणाला, 'इकडे आमचा जीव हैराण होतोय—आणि तुला आपली थट्टा सुचतेय.' आणि भुकेनें व्याकुळ झालेल्या मुलासारखें त्याचें तोंड वाकडें झालें.

—पुरुषोत्तम धाक्रस

# दोन कविता

## १

त्या रात्रीं चंद्रचांदण्याच्या धारांत विरघळून गेलीस,
आवाजहि लुप्त झाला सागराच्या संथ लयींत–
काळा काळा कोट घालून मागे उभा,
रेतींत तोंड खुपसून वर्तमान थांबला.
थांब.
त्याला तिथेंच पडूं दे, तूं चल.
रोमारोमाचे डोळे कर कारण तूं अंध आहेस.
तुझें घराणें ग्रीसमध्यें जाणारें
नाहीं तुझीं देशामध्यें, दिशांमध्यें.
पृथ्वीमध्यें पाय त्यांचे डोळे लागले दूर
लिहिणारीं बोटें लांब लांब छेडण्यासाठीं.
तुझा वारसा हा आहे थोर खूप थोर.
चांदण्याच्या धारांना तुझें इच्छित रूप आहे.
सागराच्या लाटांना घुमणारा नाद आहे,
रेतीखालचा गंध अंगभर कोंदला आहे.
ये.
धारांतून लाटांत ये लाटांतून रेतींत
रेतीच्या स्पर्शांतून बोटांच्या शब्दीं.

## २

–खिडकीमध्यें ती उभी
बाहेर बघत
पण तिला दिसतें
काळोखाच्या चौकटींत
फक्त आपलेंच प्रतिबिंब.
–रस्त्यापलिकडे तो आहे उभा
बघत झगझगीत प्रकाशाकडे
आणि आवंढे गिळत.
स्वतःकडे बघत ती प्रयत्न करते
स्वतः पलिकडे पाहाण्याचा
कदाचित् स्वप्नांमध्यें
–अशक्त तो काळोखांत लोभ
बाळगतो सर्वा विषयीं जें जें
अशक्य.

त्यांचें 'जमलें' असावें
ही अपेक्षा कां ?
आणि 'नसावें' ही तरी ?
त्यांना भविष्यकाळ नाहीं,
कारण त्याच्या स्वप्नांतली नोकरी
आणि तिची लग्नाची कोडगी
मागणी
हा भविष्यकाळ होऊं शकत नाहीं !

– म ना. परांजपे

तशी लगबगीनें ती म्हणाली, 'चल, हॉटेलांत जाऊन बसूं या.'

हॉटेलांत त्याचा खाण्याचा सपाटा पाहून तिनें शेवटीं विचारलेंच, 'दुरंगांतून सुटून आल्यासारखं काय करतोयस ? दुपारीं जेवलास कीं नाहीं ?'

तो जेवलों म्हणाला, पण त्या सांगण्याला अर्थ नव्हता. सतत तीनचार तास तो वणवणून आला होता. एका जागेचा वास लागला होता, आणि जेवणखाण विसरून त्यानें त्या जागेवर जाऊन चौकशी केली होती. तिथून तशीच गाडी पकडून तो चर्चगेटला सुनंदाला तें सांगण्यासाठीं अधीरतेनें आला होता.

त्याचा खाण्याचा सपाटा कमी झाल्यावर तिनें त्याचें आवडतें फालुदा आइस्क्रीम मागवलें. त्या थंड पेयानें डोळ्यांतली उष्णता शोषून घेतली, आणि त्याचा चेहरा टवटवीत दिसूं लागला. प्रेमानें ओथंबलेला तिचा चेहरा खुषीनें फुललेल्या त्याच्या डोळ्यांत उतरला.

'असा पाहतोस काय ?' लाजेनें संकोचून तिनें विचारलें. 'आटप लवकर. मला घरीं जायचंय सहाच्या आंत.'

'कशाला ?' तो चिथरला.

'आईनं मला बजावून ठेवलंय सहापर्यंत परत ये म्हणून. घरीं अडचण आहे—'

'लग्न झाल्यावर सुद्धां हा काच संपत नाहीं ?'

'अरे पण मला आज जेवण करायचंय–'

'जेवण गेलं खड्डयांत. एवढी त्यांची टुरटुर असेल तर आपणाला कुठेंहि हॉटेलांत जेवतां येईल.'

'पण मग राहायचंसुद्धां बाहेरच पाहावं लागेल. वेड्यासारखं करूं नकोस.आपली अडचण आहे तिथपर्यंत मिजास करून कसं भागेल ?'

यानें आगींत तेल ओतलें गेलें. आधींच त्याचा तिच्या आईबापांवर राग होता. असा बारीकसा त्याला कुठें आधार मिळला कीं तो उफाळून येई. भडकून तो तिरसटासारखा चालायला लागला. बाहेर आल्यावर तिनें त्याची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला.

पण तिकडे दुर्लक्ष करून त्यानें विचारलें, 'आत्तांच्या आत्तां एक जागा पाहायला जायचंय.'

'कुठें ?'

'येतेयस का सांग.'

नाहीं म्हणण्याची सोय नव्हती. आधींच उल्हास नि त्यांत फाल्गुन मास नको–नाहीं तर

तो पुन्हा डोक्यांत राख घालून निघून जाईल -म्हणून ती तयार झाली.

'कुठेशी आहे जागा ?'

'ग्रांटरोड.'

लागलीच त्यानें टॅक्सी ठरवली. फार्दिशी तीं दोघें पांच मिनिटांत ग्रांटरोडला आलीं.

तिथली जागा पाहून तिला मळमळून आलें. जुनी, पडकी चाळ, एका माणसाला जेमतेम जातां येईल असा जिना, जिथें तिथें चिकटलेला गलिच्छपणा...दुसऱ्या मजल्यावरचें तें बिऱ्हाड होतें. खोली एकच होती, आणि नवरा-बायको दोघेंच रहात होतीं. नवरा बायकोला तीन महिने माहेरीं पाठवणार होता, आणि त्या अवधींत अरविंदाला तिथें संसार करायला मिळणार होता. त्याच्या बदल्यांत खोलीच्या त्या मालकाचें जेवणखाण सांभाळायचें...

सुनंदाला हें सगळें ओंगळवाणें वाटलें. त्या मालकादेखत जास्त वाच्यता नको म्हणून अरविंदाला न दुखवतां ती म्हणाली, 'आपण विचार करून काय तें ठरवूं या, आणि उद्यां सांगूं या. अं ?'

'चालेल.' खोलीचा मालकच म्हणाला. त्यामुळें अरविंदाला आपली अधीरता दाबावी लागली.

पुन्हा टॅक्सींत बसल्यावर मात्र सुनंदानें स्पष्ट शब्दांत अरविंदाला विचारलें, 'या अशा ठिकाणीं—अशा अवस्थेंत राहण्यापेक्षां हॉस्टेल-मध्यें राहिलेलं काय वाईट ? '

'तीन-साडेतीनशें रुपये महिन्याचे जातील—तूं म्हणतेस तशा थाटांत रहायचं म्हणजे आज माझ्याजवळ फक्त दोनशें बावीस रुपये शिल्लक आहेत.'

यावर बोलणें खुंटलें. पण तरीसुद्धां न राहवून ती म्हणाली, 'तरी पण या अशा स्थितींत राह्यचं ? शीः ! '

'तुला माहीत नाहीं, माणसं काय अवस्थेंत राहतात या मुंबईत—'

'पण एवढं काय अडलंय ? ' ती चिडल्या-सारखी म्हणाली, 'हें असं उंदरा-मांजरासारखं जिणं-! त्यांत काय ? काढूं चारसहा महिने इकडे तिकडे.'

'म्हणजे ही जागा तुला पसंत नाहीं ? ' तो चिडून एकेरीवर आला.

क्षणोक्षणीं वाढणारी त्याची ही चीड पाहून तिला भीति वाटूं लागली. काय करावें तिला सुचेना. शेवटीं वेळ मारून नेण्यासाठीं पवित्रा

...पान ५० वर

# तीन मुक्तकें

## स्पर्श !

हवे हवेंतून तुझा स्पर्श !
पूर्व-पश्चिम साऱ्या आकाशांतून तुझा स्पर्श !
पहाटेच्या जरा आधी माझ्याच गत संकोच-स्तब्ध
असलेली ही सृष्टी...तुझ्या स्मितासारखें
निथळणारें प्रसन्न चांदणे...
...अशा वेळीं बघावे तर तुझें दृश्य !
...अशा वेळीं डोळे मिटावेत तरी तुझें दृश्य !
उल्हासानें थरकून ह्या पल्लवीचा आधार घ्यावा,
तर वीणेच्या तारेची उत्सुकता पालवीत उतरते...
...तिला स्पर्शावे तर झंकार !
...तिला न स्पर्शावे तरी झंकार !
या पहाट चांदण्याच्या स्वप्नाकडे बघत बसावे...
हळूच तुझें आमंत्रण मनांत शिरतें...उद्याच्या
कल्पनांनी मन त्या चांदण्यांत मिळून जातें...
...उद्याची कल्पना करावी तर मीलन !
...उद्याची कल्पना न करावी तरी मीलन !
हवे हवेंतून या पहाट प्रहरी तुझा ...तुझाच स्पर्श !
पूर्व न् पश्चिम...साऱ्या कणांतून: प्राण ! तुझा स्पर्श !

●●●

## कंप

पक्षी उडून गेल्यावर थरथरणारी ही एक
हिरवी डहाळी......या सायंप्रहराला अबोल
बनवीत आहे...
कसे माझ्या या हाताला सांगू...' तिला
निष्कंप बनव...'...?
पक्षी उडून गेल्यावर सूक्ष्म
थरथरणारी ही डहाळी...आज सायंप्रहरीं
थां—ब—त नाही......

●●●

## साद दे !

येथील अगणीत विसंगतींना पाहणें पुरे आता
थकलेले माझे डोळे काढून घ्यावेत आणि
दोन पारव्या समान आकाशांत तुला
शोधायला सो-डू-न द्यावेत !...
या अजाण पारव्यांना तू
ओळखशील ना ? त्यांना तूं खुणवशील ना ?
आपल्या तळहातावर उतरवून घेशील ना ?

—भास्कर कविमंडन










*अनाहूतपणें येणाऱ्या भरमसाट साहित्यांत चुकून अशी एखादी अचानक धक्का देणारीहि गोष्ट आढळते. विषय रंजक, मांडलेलाहि बरा, शैलीहि चांगली. अशीच ही एक गोष्ट. अंजनगांवांतल्या एका चांगल्या मास्तराची......*

—रत्नाकर श्री. कौलगुड



रंगा मास्तर त्या दिवसापर्यंत अगदीं खरचं मजेंत होता. अंजनगांवसारखं एक शिक्षकी गांव जरी त्याला मिळालं होतं; तरी त्याबद्दल त्याची मुळीच तक्रार नव्हती.

सकाळीं लौकर उठावं. थोडी फार मेहनत करावी. आणि दूध पिउन शाळेंत यावं; ते थेट दहा वाजेपर्यंत. शाळा सुटली कीं थेट खोली गांठावी व दोन-चार चपात्या व झणझणीत भाजी करावी. ती झाकून ठेवून थेट आबासाहेब पाटलाची विहीर गांठावी. तेथें तासभर मनसोक्त डुंबल्यावर खोलीवर येऊन जेवण उरकावं. थोडी झोप अगर वाचन होईपर्यंत दुपारच्या शाळेची वेळ होई. संध्याकाळीं शाळा सुटल्या-वर मास्तर घरीं गेला कीं सकाळीच दृष्टीस पडे.

तसा खेड्यांतहि मास्तर चांगलं वजन पाडून होता. त्यानं आपल्या कडक इस्त्रीच्या शर्टाची शान बिघडूं दिली नव्हती कीं मर्सराइज्ड धोतरावर सुरकुती ! डोक्याचं सुवासिक टाटा ऑईल कधीं विसरलं नव्हतं. कानांतला अत्त-राचा फाया आपली जागा कधीं सोडत नसे.

एकंदरींत रंगा मास्तर फारच व्यवस्थित व चांगला वागत होता. रुळावरील आगगाडी-सारखं त्याचं जीवन व्यवस्थित चालूं होतं.

प्रसंगानुरूप तो माणसांतहि मिसळे. पाट-लाच्या घरीं चहाला जाई. कुलकर्ण्यांच्या घरीं पान खायला जाई किंवा तालमीवरून जातांना हांक आली तर तिथंहि बसे.

पण मोजकं बोलणं ! पद्धतशीर वागणं ! सभ्येतनं हंसणं ! आणि हेंच अंजनगांवच्या लोकांना पसंत नव्हतं.

त्यांना वाटायचं मास्तरनं आपल्यांत मिस-ळावं, पानतंबाकू खावी. मांडीला मांडी लावून तमाशा पहावा. चरचट बडबड करावी. स्वतःला दोन पैसे झळ लावून घ्यावी व दुसऱ्यालाहि द्यावी. हें असलं पद्धतशीर वागणं शहरांत शोभतं-हिथं काय ? म्हणून मास्तरच्या माघारीहि अशाच गप्पा चालत.

‘ काय बी म्हन, गना,. मास्तर लई बेक्कार मानूस ! ’

‘ नव्हं, जरा गंडारलेला दिसतूया ! ’

‘ त्याचा गंड काढू काय ? या संकऱ्याला एक मिलीट टाईम पुरे ! ’

‘ इक्ता ताटपना काय उपेगाचा ! ’











अनुक्रमणिका

'हिथं नगो तउला चावरटपना करूं म्हनांव, हे पुनं अगर सोलापूर न्हवं म्हणावं; अंजनगांव हाये!'

अशाच गप्पा चालत. पण रंगाला त्याची फिकीर वाटत नसे. त्याचा दिनक्रम पद्धतशीर चालू होता. एकाद्या फुलपांखराप्रमाणें स्वच्छंदी जीवन जगत होता रंगा मास्तर.

मग त्या दिवशींच.........!

त्याचं असं झालं होतं. नित्याप्रमाणें मास्तरनं शाळा सोडली. सामानाची आवराआवर केली. दुपारीं पोरांना लवकर यायला सूचना दिली. शाळेला कुलूप ठोकलें व तो निघाला.

मारुतीला वळसा घालून वेशींत शिरणार तोच त्याच्या कानावर हांक आली.

'अवो, मास्तर साव!'

वेसणीला हिसका यावा तसा मास्तर हाकेनें वळला. पारावर शंकर पाटील तंबाखू रवंथ करीत होता. आणि त्या पाराशेजारी एक सुस्वरूप तरुणी आंब्याची पाटी घेऊन बसली होती.

रसरशीत, पिकलेल्या आंब्याची पाटी घेऊन बसलेली ती तरुणी खरोखरच आंब्याप्रमाणेंच रसरशीत होती. पिवळसर आंब्याप्रमाणें तिचा वर्ण होता. शेंदरी आंब्याची लाली तिच्या गालावर पसरली होती. पाडाच्या कैरी-प्रमाणें तिचें वय सतरा-अठराचं होतें.

तिनं हांक मारतांच कुणाचेहि पाय वळले असते मग रंगा मास्तर वळला यांत विशेष काय? मंत्रमुग्धाप्रमाणें रंगामास्तर पाराजवळ आला.

'अवो मास्तर काअी आंबेबिंबे घ्या की'! आंबरसाप्रमाणें मधुर अशा हास्याच्या खळ-खळाटांत ती उद्गारली.

'कसे दिले?' मास्तरनें बावळटपणें विचारलें.

'रुपयाला आठ!'

'द्या रुपायाचे!'

मास्तरनें रुपयाचे आंबे घेऊन पांच रु. ची नोट दिली आणि मोड देतांना सहजपणें झालेला अगर बुद्धिपुरस्सर केलेला तिचा हस्त-स्पर्श आठवीत वेड्यापणें मास्तर खोलीवर परतला.

ती तरुणी होतीच तशी! वयानं सतरा-अठरा! गौरवर्ण, सडपातळ, पण प्रमाणबद्ध काया, रेखीव अवयव, मोहक चेहरा, बोलके डोळे अन् ओठ, अन् कुणालाहि बेभानपणा उत्पन्न करणारें वक्षद्वय! यांच्यामुळें म्हणा अगर संवयीमुळें चालणारी बडबड, प्रसंगी जरा फाजील सुद्धां! त्यामुळें मनुष्याचें पाऊल क्षणभर तरी तेथें घुटमळे! थबके! नजर फिरे! नेत्रसुख होई! पण अंतःकरणांत खळबळ माजे! असाधारण पोकळी निर्माण होई.

मनाला वाटे,

'आयला, काय पण माल हाये!'

'निस्ती अपसरा कां रंभा म्हनत्यात त्या परीस उजवी!'

'काय पन देवाची घडन बघा!'

'न्हाईतर आमचं बरचं भूत! आठ आठ दिस टक्करं पिंजत न्हाई कां दोन दोन रोज आंगूळ!'

'हं, आपल्या नसिबांत नगो कां बाबा!'

अशा विचाराच्या लहरी घुटमळत. मनाला उगाचच हुरहुर वाटे. मन बेचैन होई. मग रंगा मास्तर बेचैन झाल्यास त्यांत कांहींच आश्चर्य नव्हतें.

फरक एवढाच कीं इतर माणसें क्षणभर हळहळत व पुन्हां आपापल्या कार्यक्रमांत सारं विसरून जात. पण रंगाला तें विसरता येत नव्हतं. त्याचा पिंडच वेगळा होता.

तो मेहनत, दूध, जेवण, शाळा सारं सारं विसरला. कांहींतरी करून तेवढा 'चान्स' मारला पाहिजे. तो मनाला बजावूं लागला. पण कांहीं-तरी म्हणजे काय हे त्याला सुचेना. इतके दिवस कसं सारं छान सुरळीत चालू होतं व चालणारहि होतं. पण त्या आंबेवालीनं दृष्टीस पडून सारा घोटाळा केला होता. बरं त्याचा शेवट तरी काय होणार होता कुणास ठाऊक!

एवढं मात्र खरं कीं त्या दिवसापर्यंतचं त्याचं सुख नष्ट झालं. भूक संपली व झोप उडाली. थोडक्यांत म्हणजे मास्तर झुरणीला लागला. अशा विचार तंद्रींत तो होता. इतक्यांत त्याच्या मनांत एक शंका आली.

दुपारची शाळा सुटली. नेहमीप्रमाणें उशीरा न सुटता थोडी लवकरच! व मास्तर तेथून निघाला तो थेट शंकर पाटलाच्या घरीं आला. शंकर पाटलाच्या घरची सारीं माणसं रानांत गेली होती शंकरला मात्र 'घरें' वाटत नसल्यामुळें तो घरींच होता.

आंबेवाली, पेरूवाली, भाजीवाली, तमाशा इत्यादि जिनसा गांवात आल्यावर शंकरची तब्येत बिघडते हें त्याच्या घरच्यानांच काय पण साऱ्या गांवाला माहीत होतं. शंकर बाजेवर लोळत पडला होता. उघडाच होता. त्याच्या हातांत कुठल्याशा मराठी लावणीपटाचें पुस्तक होतें व तो कांहींतरी गुणगुणत होता.

'शंकरराव!' मास्तरनें आरोळी ठोकली.

शंकर चमकून उठला. 'या मास्तर' अंगावर सदरा अडकवत तो म्हणाला.

'काय चाललंय शंकरराव!' मास्तर.

'काई न्हाई, उगाच लवंडलो होतो.' शंकर.

'तुम्ही काय करतो लोक!' मास्तर कांहीं-तरी बोलायचं म्हणून बोलला.

'कशाचा राजा अन् कशाचा परदान मास्तर! काईतरी करून दिवस काढायचे अन् काय?' शंकर.

'पर तुमी हिकडं कसं काय बाबा? चमत्कारच म्हनला पायजे!' शंकरनें मुद्यास हात घातला.

'कां येऊ नये कां?' रंगानं खरं टाळलं.

'तसं न्हवं! पन मानूस काय उगाच फिरकत न्हाई!' मास्तरला वाटत होतें तितका शंकर 'भोळा सांब' नव्हता.

'आंबेवाली गेली कां?' मास्तरनें तादृशीं विचारलें.

'तिच्या नादावर आला व्हता व्हयं! मला काय वो ठावा!' शंकर म्हणाला.

'तसं काई न्हाई! उगाच आपलं...!' मास्तर.

'मंजे काईतरी पानी मुरतंय आं!' त्याचे वाक्य तोडीत शंकर मिस्किलपणें म्हणाला.

'कशाचं पाणी अन् लोणी शंकर राव !' मास्तर.

'कां ल्ई उदास दिसता मास्तर ! अगदीं काळजाला चटका लागलाय वाटतं.' शंकरनें विचारलें.

'एकदां भेट घालून द्या कीं शंकरराव !' मास्तर.

मंजे ? मी काय हेड्या हाये कीं काय ? थेट सोता जावं, भेटावं !' शंकर चेष्टा करीत म्हणाला.

'हे बघा शंकरराव,' मास्तर म्हणाला.

'बोला,' शंकरराव म्हणाले.

'तुम्ही एक तरणीताठी, देखणी अन् भर ज्वानींत आलेली एक अनोळखी पोरगी पाहिली !' मास्तर मुलांना उदाहरण देण्याच्या पद्धतींत म्हणाला.

'बरं !' खुललेल्या सुरांत शंकर म्हणाला.

'ती पोरगी बघतांच तुमच्या मनांत भरली !' मास्तर पुढें म्हणाला.

'बरं, बरं !' मांडी नीट सावरून घालत शंकर म्हणाला.

'तर काय होईल ?' मास्तर म्हणाला.

'काय हुईल ?' शंकरनें आशेनें विचारलें.

'काय होईल ?' मास्तर.

'काय हुईल ?' शंकर.

'काय होईल ?' मास्तर.

'न्हवं काय हुईल ? शंकर.

काहीं तरी होईल ना मनांत ?' शंकरच्या प्रश्नानें चिडून शेवटीं मास्तरनेंच उत्तर दिलें.

'हां, मनांमधें काहीं तरी हुईल आं !' शंकरनें मान डोलावून सांगितलें.

'तसंच माझ्या मनाचं झालंय बघा !' मास्तर म्हणाला.

'अन् तेला विलाज म्हनून आंब्रेवालीची भेट होवी. खरं नां ?' शंकरनें कुस्ती मारल्याच्या मुद्रेनें विचारलें. मान डोलावीत शंकरला उत्तेजन देण्याच्या सुरांत मास्तर म्हणाला, आणि हें काम तुमच्या शिवाय होणार नाहीं शंकरराव !'

'हे बघा मास्तर, तिचा माझा काओी दाट परिचय व्हाओ ! मी निस्ता तुमचा निरोप सांगतो व उद्यां तुमच्या खोलीवर पाठवतो. मग बगा तुमी अन ती ! कसं !' शंकर म्हणाला.

'बरं बरं,!' प्रसन्न मुद्रेनें रंगा मास्तर म्हणाला. मग 'चापानी' झालें. पानसुपारी झाली. अन् दोघे जुनी पुराणी दोस्ती असल्याच्या आविर्भावांत खांद्यावर हात टाकून उठले.

'बरं मग जाऊं !' मास्तरनें विचारलें.

'अगदीं बिनघोर ! उद्यां संध्याकाळीं सात वाजतां......!'

शंकर मुद्दामच थांबला व त्यानें डोळे मिचकावले.

एक नवें 'Fool'




'लीलाला तिचा मित्र 'एप्रिल फूल' भेट देण्या अगोदर तूं मला दिलंस तरच करीन मी तुझ्याशीं लग्न ?—'

'संध्याकाळी सात वाजतां...!' हे शंकरचे शब्द मास्तरला अमृताप्रमाणें वाटले. त्याला रात्रीं जेवण सुचलें नाहीं कीं झोप आली नाहीं. त्याच्या अतृप्त मनाची तृप्ती होणार होती. त्याचं तडफडणारें बेचैन मन शांत होणार होतं. त्याच्या मनाला अपूर्व असं समाधान मिळणार होतं; कीं त्यानं आजपर्यंत जें कथा-कादंबऱ्यांत वाचलं होतं; चित्रपटांत जें पाहिलं होतं असं कांहींसं रोमांचकारी जीवन तो अनुभवणार होता. अल्पकाल कां होईना पण प्रत्यक्षांत, पुढील साऱ्या आयुष्यांत पुन्हां पुन्हां स्मृतींच चर्वण करतांना मिळावं असं एक गुपित त्याला अनुभवायला मिळणार होतं. मग त्याला जेवण, झोप, शाळा, इत्यादि क्षुल्लक बाबी कोठून सुचणार ?

संध्याकाळचे सात वाजत आले होते. काळोख चोरपावलांनीं येऊं लागला होता व आपल्या खोलींत दिव्याजवळ कसलं तरी पुस्तक ठेवून ते वाचण्याचा निष्फळ प्रयत्न मास्तर करीत होता. त्याचें सारें लक्ष पुढें लोटलेल्या दाराकडे होते व एक असामान्य अधिरता त्याच्या धडधडत्या काळजांत भिरभिरत होती.

दारावर 'टक् टक्' असा आवाज झाला व उतावीळपणानं रंगा मास्तरनें दार उघडलें. दारांत आंब्रेवाली उभी होती. मास्तरला ब्रह्मानंद झाला. तिथं जर शंकर पाटील असता तर मास्तरनें खरोखर त्याचे पाय धरले असते.

'याना आंत !' मास्तर म्हणाला.

ती आंत आली. येतांना तिनंच दार लोटलं. गुलाबी रंगाच्या पातळावर तिनं गर्द हिरवी चोळी घातली होती. कपाळावर केसांच्या दोन बटा भुरभुरत होत्या. डोळ्यांत कमालीचा मिस्किलपणा जमला होता. गोंडस गोऱ्या हाताच्या बांगड्याच्या आवाजानें मास्तरला भानावर आणीत ती म्हणाली,

'कां बोलावलं वो मास्तर ?'

'बसा कीं खाली.' एक घुटका गिळून मास्तर म्हणाला. ती पद्धतशीरपणें बसली.

'पन काम तरी काय होतं बाबा ?' मुद्दाम भुवई उडवत ती म्हणाली.

'कामाशिवाय कुणी कुणाला बोलावू नये काय ?' मास्तरच्या स्वरांत बराच धीटपणा आला. मग बराच वेळ कांहींच बोलणं झालं नाहीं. तिनं एक नाजूक जांभई दिली.

'चहा करूं ?' मास्तरनें विचारलें.

'अं हं !' मान वेळावीत ती म्हणाली.

'दाराला कडी लावलीय ?' कंपित सुरांत मास्तरनें विचारलं.

'अं हं !' पुन्हां पहिलेंच प्रात्यक्षिक !

'लावू ?' मास्तर म्हणाला.

'हं !' एक सुस्कारा आला,

'मास्तर उल्हासित मुद्रेनं उठला. त्यानं दाराला कडी घातली. प्रफुल्लीत मुद्रेनं तो वळला. सारं कसं झक्क जमलं होतं. कथा-कादंबऱ्यापेक्षांहि !

मास्तर वळला. ती तरुणी उभी राहिली होती. मास्तर पुढें सरकला. तिच्या समीप आला. तिचे थंड श्वास त्याच्या अंगावर कांटा उभारून गेले. त्यानं झट्दिशीं तिचा हात धरला. मऊ, लुसलुशीत, कोमल, हात ! त्यानें घट्ट दाबला.

तोच दाराला बाहेरून कडी घातल्याचा आवाज आला. मास्तरची धुंदी खाड्कन उतरली व अंगावर घाम फुटला.

बाहेरून दार ठोठावल्याचा आवाज आला. मास्तरनें धीर धरून विचारलें,

'कोण आहे ?'

'तुझा बा !' बाहेरून आवाज आला. त्यासरशीं मास्तरचा धीर खचला. त्यानें त्या तरुणीकडे पाहिलें. तीहि भ्यालेल्या हरिणी-प्रमाणें उभी होती.

'बायली, हे मास्तर मोटं गरीब अन् खुळं दिसत व्हतं !' बाहेरचा एक आवाज.

तिथं आतां चारपांच माणसें गोळा झाली असावीत असा रंगानें अंदाज केला.

'ही काय भानगड झाली. सारं कसं सुरळीत चाललं होतं. पण आतां !' रंगाच्या मनांत विचार आला.

'जरा दार उघडता कां ?' त्यानें केविल-वाण्या सुरांत विचारलें.

'कां ? मज्जा करा कीं ! आमी बसतो राखान !'

बाहेरून कुत्सित स्वर आला. 'शाळेंत पोराना हेंच शिकवता ?'

'एकदां चुकलो पुन्हां नाओी...!' मास्तर. त्याला पुरतं बोलूं न देतां बाहेरचा आवाज गुरगुरला, 'शंभर रुपये पडतील !'

'शंभर रुपये ?' काकुळत्या स्वरांत मास्तरनें विचारलें.

'गंणा, तूं काठी आन् ! ह्यो तसा ऐकायचा न्हाई ! भानगडी करायला पायजेत, लोकांच्या गांवात येऊन ?'

ती आंबेवाली मास्तरचा हात धरून म्हणाली,

'अवो, द्या कीं ते काय म्हनतात ते ? उगाच तरास दोघांना बी ! अग आई ग, उगाचच मी आले. मला कांय ठावा...!' ती स्फुंदूं लागली.

'मग कसं मास्तर !' बाहेरचा करडा आवाज.

'नोटा कीं सोटा ?' दुसरा आवाज. मास्तर कात्रींत सांपडला. अजूनहि जास्त बोभाटा व्हायच्या आंत सारं मिटेल असं त्याला वाटलं. झट्दिशीं ट्रंक उघडून नुकत्याच झालेल्या पगाराच्या नोटा काढल्या व दाराच्या फटींतून बाहेर सरकवल्या. खस्सदिशीं नोटा हिसकल्या गेल्या.

'गणा, मोजून घे नीट ! मास्तर इथबी चाबरटपना करील !' बाहेरचा आवाज.

'त्येची नगो काळजी !' माणसं पांगली. दाराची कडी काढली गेली.

आणि आंतली कडी काढून ती आंबेवाली पाखराप्रमाणें निसटली.

रंगा मास्तरच्या डोक्यावरचा ओझा उतरला. छातीवरचं दडपण निसटलं. तो गादीवर पडला. खेड्यांतला एक चमत्कारिक पण अविस्मरणीय अनुभव त्यांच्या मनावर ठसा उमटवून गेला होता. न केलेल्या भानगडीचें त्याला जबरदस्त मोलं द्यावें लागलें होतें. सारी रात्र त्याला झोप आली नाहीं.

सारी रात्र आंबेवाली व रंगा मास्तर यांनीं जागून काढली. त्याच्या 'स्पेशल' खोलीमध्यें. शंकरनें पन्नास रुपयाच्या नोटा तिच्या अंगावर फेकल्या होत्या व तो तिला मिठींत घेऊन म्हणत होता, 'शिकार वाघालाच मिळते, सशाला न्हाई, हे सांगायचं मला त्या मास्तरला एकदां !' •••



# जेव्हां विचार रणगाड्यावर आरूढ होऊन येतात ?

—वसंत फेणे

*२० ऑक्टोबर ६२ रोजीं लाल चीननें उघडपणें सशस्त्र स्वारी केली. बरोबर अेक महिन्यानें युद्धविरामहि जाहीर केला. या दोन्हीं घटनांबद्दल अनेक तर्कवितर्क करण्यांत येतात. पण लाल चीन ज्या साम्यवादी तत्त्वज्ञानाचा कडवा उपासक आहे त्या तत्त्वज्ञानाच्या संदर्भांत या संघर्षाचें निरूपण करणें बोधप्रद ठरावें.*

..........................................................

**गेल्या** वर्षीच्या ऑक्टोबर महिन्यांत कम्युनिस्ट चीननें भारतीय प्रदेशावर सशस्त्र स्वारी केली. अन् बरोबर एका महिन्यानें एकतर्फी युद्धविराम जाहीर केला. चीन भारतावर सशस्त्र स्वारी करील असें बहुसंख्य लोकांना नि राज्यकर्त्यांनाहि वाटलेंच नव्हतें. त्यामुळें कम्युनिस्ट चीननें देवतात्मा हिमालयांचा कवलग्रास करण्यासाठीं आपला आक्रमक जबडा जेव्हां उघडला तेव्हां सारेच थक्क झाले ! या प्रकाराची अंधुकशीहि कल्पना सरकारला नसल्यानें साहजिकच सुरवातीला आपल्या शूर जवानांनाहि पिछेहाट पत्करावी लागली. पण भारतीय सेनेची पिछेहाट होत असतानांच कम्युनिस्ट चीननें दुसरा धक्का दिला. त्यानें एकतर्फी युद्धविराम जाहीर केला ! एवढेंच नव्हे तर पादाक्रांत केलेल्या प्रदेशांतून सेना मागें घेण्यासहि चीन तयार झाला.

## स्वारीचा हेतु काय ?

हा सारा खटाटोप कम्युनिस्ट चीननं कां बरं केला ? चीननं केलेल्या लष्करी स्वारीमुळें नि त्यापेक्षांहि युद्धविरामामुळें जाणते देखील गोंधळांत पडले.

कांहींच्या मतें 'चीनला लडाखचा भाग पाहिजे आहे. तो बऱ्या-बोलानें द्यावयास भारत तयार नसेल तर शस्त्रबळ वापरून लडाखचें दान द्यावयास भारताला तयार करणें हा चीनचा एकमेव हेतु होय. पण कांहींना असेंहि वाटतें कीं आशियाची देशांचें नेतृत्व भारताकडे आहे तें आपल्याकडे यावें म्हणून भारतावर स्वारी करून चीननें भारताची प्रतिष्ठा कमी करण्याचा प्रयत्न केला.

चीनच्या अंतर्गत परिस्थितीचें सम्यक्ज्ञान असल्याचा दावा कांही करतात. त्यांनीं असं प्रतिपादन केलं कीं चीनच्या योजना फसल्या. चिनी कम्युनिस्ट पक्षाची 'लांब उडी' खड्ड्यांत पडली. म्हणून लोकांचं लक्ष दुसरीकडे वेधण्यासाठीं चीननें भारताविरुद्ध लष्करी मोहिम सुरू केली.

या प्रकारचे अनेक अंदाज व्यक्त करण्यांत आले. त्यामध्यें थोडा-फार सत्याचा अंश असेलहि. पण त्यामुळें चीनच्या लष्करी मोहिमेचा उलगडा होऊं शकत नाहीं.

उदाहरणार्थ, केवळ लडाखचाच भाग चीनला पाहिजे असेल तर या स्वारीची आवश्यकताच काय होती ? लडाखच्या ज्या भागावर चीन दावा सांगतो त्यापैकीं बहुतेक सर्व भाग त्याच्या अंकितच आहे. आणि उरलेल्या भागावर तो जसा दावा सांगतो तसा नेफावरहि सांगतो. म्हणजे केवळ भारतानें लडाखचें दान करावें या हेतूनें चीननें स्वारी केली असें म्हणणें चूक होईल.

आशियाची देशांच्या नेतृत्वाचा मुद्दाहि टिकणारा नाहीं. 'आशियाची देशांचं नेतृत्व' या शब्दप्रयोगानं आपल्या राष्ट्रीय स्वाभिमानाला बरं वाटतं ही गोष्ट खरी. पण त्याहूनहि अधिक खरी गोष्ट ही आहे कीं आशियायी देशांचं नेतृत्व भारताकडे नाहींच. आशियाची पुरी विभागणी कधींच झाली आहे. आशियांतील कांहीं देश अँग्लो-अमेरिकन सत्तागटांत आहेत, तर कांहीं साम्यवादी सत्ता-गटांत सामील झाले आहेत. आणि ब्रह्मदेश, अिण्डोनेशिया, सिलोन यासारखे तटस्थ देशहि भारताचं नेतृत्व कितपत मानतात हें गेल्या कांहीं वर्षांत दिसून आलेंच होतें, तें चीनच्या स्वारीनंतर पूर्णपणें उघड झालें आहे !







### संघर्ष सैद्धांतिक आहे का ?

काहीं विचारवंतांनीं हा लढा लोकशाही व कम्युनिझम या तत्त्वज्ञानांतील संघर्ष आहे असं सांगितलं आहे. कोलंबोला षड्राष्ट्र बैठक सुरू होण्यापूर्वी आपली बाजू सिलोनला समजावून देण्यासाठीं परराष्ट्र खात्याच्या राज्यमंत्री श्रीमति लक्ष्मी मेनन तेथें गेल्या होत्या. त्यानीहि संघर्षाचें खरें स्वरूप सैद्धांतिक आहे असेंच सांगितलें होतें.

भारत हा संसदीय लोकशाहीवादी देश. उलट चीन हा साम्यवादी तत्त्वज्ञानाचा कडवा पुरस्कर्ता. असें असूनहि दोन्ही देशांच्या पंत-प्रधानांनीं अनेक वेळां एकमेकांना प्रेमालिंगनं दिलीं होतीं. अगदीं जाहीररीत्या लाल चीनला जागतिक रंगमंचावर प्रतिष्ठा मिळवून देण्यास पंडित जवाहरलालजींइतके कुणी कारणीभूत झालें नसेल.

तशांत भारताचे दुसऱ्या कम्युनिस्ट राष्ट्रांबरोबर संबंध अजूनहि सलोख्याचे आहेत. रशिया तर भारताला आपला मित्र मानतो. मग हा संघर्ष दोन तत्त्वज्ञानामधील कसा ? भारताचें लोकशाही तत्त्वज्ञान कम्युनिझमशीं संघर्ष करण्याची आवश्यकता प्रतिपादत नाहीं; भारताची लोकशाहीनिष्ठा साम्यवाद्यांशीं संघर्ष अटळ आहे असें मानीत नाहीं. मग हा दोन तत्त्वज्ञानांतील संघर्ष कसा ?

### ऐतिहासिक अपरिहार्यतेचें तत्त्व

लोकशाहीवादी साम्यवाद्यांशीं लढा अटळ मानीत नाहींत. त्यामुळें हा दोन तत्त्वज्ञानामधील संघर्ष आहे हें आपणास प्रतीत होणें कठीण होतें. म्हणूनच वर उल्लेखिलेल्यासारखीं कारणें आपण हुडकतो. कम्युनिस्ट तत्त्वज्ञानामुळें नव्हे तर चीनच्या परंपरागत आक्रमक वृत्तीमुळें त्यानें हें आक्रमण केलें असावें अशी समजूत करून घेतो. दलितांच्या विमोचनाचें व्रत अंगिकारणारें तत्त्वज्ञान असा ज्याचा गवगवा झाला आहे त्यांतच अशा आक्रमणांचीं बीजें असतील हें पटत नाहीं. पण अशा प्रकारचीं युद्धं हीं ऐतिहासिक अपरिहार्यतेमुळें निर्माण होतात; तीं चुकविणें शक्य नाहीं असा साम्यवादी तत्त्वज्ञानाचा दावा आहे. कम्युनिस्ट देशांनीं इतरांवर केलेलीं आक्रमणें हा 'दलित-विमोचना'चा अवश्यमेव भाग आहे असें त्या तत्त्वज्ञानाच्या गाभ्यांत आहे.

**'जोंपर्यंत भांडवलशाही आणि समाजवाद अस्तित्वांत आहेत तोंपर्यन्त युद्धें अपरिहार्य आहेत. अखेरीला दोहों-पैकीं एकाचा विजय होईल; आणि एकाचें मृत्युगीत अपरि-हार्यपणें गावें लागेल!'** अशा स्पष्ट शब्दांत लेनिननें युद्धाची अपरिहार्यता नमूद करून ठेवली आहे. (पहा:–Selected works व V. I. Lenin VIII–297 ) याचा अर्थच असा कीं लोकशाहीवादी साम्यवाद्यां-बरोबर 'शांततामय सहअस्तित्व' शक्य आहे असें भले मानोत, खरा साम्यवादी तसं मानणार नाहीं. तसं तो मानीत असेल तर तो साम्यवादी तरी नाहीं किंवा तसा तो आव आणतो असें समजावयास हरकत नाहीं !

## महत्वाची सूचना

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**

चिनी राज्यकर्ते साम्यवादी आहेत. त्यांनीं 'शांततामय सहजीवना'चें साम्यवाद-विरोधी तत्व कधींच मानलें नाहीं. पण आव मात्र तसा आणला. म्हणून आमच्यापैकीं बऱ्याच लोकांना वाटतें कीं चीननें विश्वासघात केला. चीननें विश्वासघात केला नाहीं, तो आपल्या लाल तत्त्वज्ञानाशीं प्रामाणिक राहिला. फक्त आपण त्या तत्त्वज्ञानाच्या सत्य स्वरूपाची उपेक्षा केली आणि परिणामी फसलों.

चीननें ज्याप्रकारें भारतावर सशस्त्र स्वारी केली त्या प्रकारची स्वारीदेखील 'साम्यवादाच्या विजया'साठीं आवश्यक आहे असं लेनिननं बजावून ठेवलं आहे. साम्यवादी देश अितर देशांतील साम्यवादी क्रांतीसाठीं कशी मदत देऊं शकेल ? या प्रश्नाचं उत्तर लेनिननं दिलं आहे.

**'अशा भांडवलशाही राष्ट्रांतील पिळल्या जाणाऱ्या वर्गांना आकृष्ट करून तद्देशीय भांडवलशाही विरुद्ध बंड चेतवून आणि वेळप्रसंगीं त्या देशाविरुद्ध सशस्त्र बळ वापरून अशी मदत करता येईल.'**

अशा स्पष्ट भाषेंत लेनिननें वरील प्रश्नाचें उत्तर देऊन ठेवलें आहे. ( पहा:–Selected works व Lenin XVIII—33 )

यावरून अेक गोष्ट स्पष्ट व्हावी. ती अशी कीं, दोन्ही देशांचीं तत्त्वज्ञानं वेगळीं म्हणूनच कांहीं हा लढा निर्माण झाला नाहीं; तर दोहोंपैकीं एका तत्त्वज्ञानाच्या गाभ्यांतच असा सशस्त्र संघर्ष--परदेशावरील लष्करी स्वारीत अंतर्भूत आहे.

भारतांतील साम्यवाद्यांची चीनला आक्रमक ठरविण्याबाबत जी कुतरओढ झाली त्याचें कारण हेंच. साम्यवादी तत्त्वज्ञानावर त्यांचा पिंड पोसला गेल्यानें त्यांना प्रामाणिकपणें वाटतें कीं चीनचें आक्रमण हें जागतिक साम्यवादी आंदोलनाचा भाग आहे; साम्यवादाचें स्वरूप आंतरराष्ट्रीय असल्यानें हें आक्रमण परक्यांचें मानता कामा नये; भारतांतली राजवट शेतकरी–कामकरी वर्गाची नव्हे; तिला नेस्तनाबूत करण्यासाठीं चिनी किसान मजदुरांनीं मोहीम उभारली आहे तर त्यांत अयोग्य तें काय ? जास्त सोपें करून सांगावयाचें म्हणजे निवडणुकांच्या कालांत पक्षोपपक्षांच्या प्रचार-मोहिमा निघणें ही गोष्ट सामान्य माणसाला जशी आवश्यक व स्वाभाविक वाटते, तशीच साम्यवाद्यांना साम्यवादी राजवटीनें केलेली लष्करी मोहीम आवश्यक व स्वाभाविक वाटतें !

### भारत–चीन संघर्षाचें साम्यवादी निरूपण

आपण या युद्धाकडे कोणत्या दृष्टिकोनांतून पहातो या पेक्षांहि चिनी राज्यकर्ते त्याकडे कोणत्या रीतीनें पहातात. याचा विचार करणें अधिक महत्वाचें आहे. त्यावरून या संघर्षाचें स्वरूप नेमकें कसें आहे याचें आकलन होणें सोंपें जावें.

चिनी राज्यकर्ते हे साम्यवादी तत्वज्ञानाचें कडवे उपासक. या संघर्षाबाबतचा त्यांचा दृष्टिकोन तपासणें म्हणजेच या संघर्षाचें निरूपण करणें होय. या ठिकाणींहि साम्यवादी क्रांतीचा प्रणेता आणि तत्ववेत्ता लेनिन याच्याच लिखाणाचा मागोवा घेणें योग्य ठरावें. कारण रशियन व चिनी राज्यकर्ते नेहमी त्याचाच आधार घेतात आणि अजूनहि 'शांततामय सहअस्तित्वा'च्या कल्पनेचा पुकार करणारा ( हा प्रामाणिक असतो कां प्रचारांकरितां असतो हा महत्वाचा प्रश्न क्षणभर बाजूला ठेवूं ) क्रुश्चेव्ह देखील लेनिनच्या शिक-वणुकीची शपथ दरवेळीं घेत असतो.





साम्यवादी हे शांततेचे पुरस्कर्ते असले तरी इतर शांततावाद्यांत व साम्यवाद्यांत फरक आहे असें सुचवितांना लेनिन म्हणतो, 'साम्यवाद्यांत आणि इतर भांडवलदार व मध्यमवर्गीय (म्हणजे साम्यवादी सोडून इतर सर्वच) शांततावाद्यांत **मूलभूत फरक** आहे. कारण युद्धें आणि वर्गविग्रह यांचें नातें अतूट आहे असें आम्ही मानतों. साम्यवादाची प्रस्थापना (सर्वत्र) झाल्याशिवाय युद्धें थांबणेंच शक्य नाहीं; एवढंच नव्हें तर देशांतर्गत यादवी होणें हें पिळलेल्या वर्गाच्या दृष्टीनं पुरोगामीपणाचें आहे. अशी यादवी आवश्यक व अपरिहार्य आहे!' (पहाः–V. I. Lenin Socialism and War)

पण कोणत्याहि तत्त्वज्ञानाचा प्रसार होण्याकरितां युद्धाची आवश्यकता काय? तत्त्वज्ञान ही वैचारिक गोष्ट. ती का संगिनी व रणगाडे यांनीं पटवून द्यावयाची असते? असा प्रश्न सहाजिकच मनापुढें येतो. या प्रश्नाचं उत्तरहि 'War is a continuation of politics by other (i. e. violent) means' या सुप्रसिद्ध विधानांत Clause Witz यानें दिलें असून लेनिननेंहि त्याचाच अनुवाद केला आहे. 'कोणत्याहि युद्धाची इष्टानिष्टता तपासून पहायची ती याच विधानांत ध्वनित केलेल्या निकषावरच होय.' असं लेनिननं आवर्जून सांगितलें आहे. (पहाः–क्रित्ता–पृष्ठ २१)

यावरून काय दिसून येते? तर 'शांततामय सहजीवना'वर साम्यवाद्यांचा अजिबात विश्वास नाहीं. युद्धें आवश्यक आहेत, अपरिहार्य आहेत अन् पुरोगामी राजकारणाचा तीं अविभाज्य भाग आहेत असं ते मानतात. 'शांततामय सहजीवना'चा **पुरस्कार** करणाऱ्या क्रुश्चेव्हनें याला धक्का दिला असें म्हणायचें का? त्यानें वेळोवेळीं शांततेचा पुकारा जरूर केला. (प्रत्येक आक्रमणाच्यावेळीं हिटलरहि जागतिक शांततेचा पुकारा करीत असे) पण लेनिनचा वरील सिद्धान्त त्यानें चुकीचा आहे असं कधींच म्हटलं नाहीं. उलट, हंगेरी, पोलंड, पूर्व जर्मनी येथील जनतेचे उठाव चिरडण्यासाठीं त्यानें रशियन लाल सेना लेनिनच्या वरील शिकवणुकीप्रमाणेंच धाडल्या होत्या. (अर्थात् आपला शांततेचा आग्रह प्रामाणिक म्हणून इतरांची शांततेची हाकाटी लटकी मानूं नये असं कुणी म्हणत असल्यास प्रश्नच मिटला.)

देश युद्धांत गुंतला असेल तर 'मातृभूमीच्या संरक्षणा'ची भावना निर्माण होणें आणि त्यासाठीं प्रयत्न करणें हें कामगारवर्गद्रोही आहे असेंहि लेनिननं बजावलं आहे. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं, अस्तित्वासाठीं युद्ध चालू आहे म्हणणें ही भांडवलदारी पद्धत होय. त्यांना साथ देणं चुकीचं आहे. युद्धकाळांत वर्गसंघर्षांना सोडचिठ्ठी देणं, औद्योगिक तंट्यांना विराम देणं हें देखील कामगारवर्गाच्या अंतिम हिताच्या दृष्टीनं चुकीचं अन् भांडवलदारी सापळ्यांत पडण्यासारखं आहे असंहि तो म्हणतो.

'Unity with the opportunists means alliance between the workers and 'their' national bourgeoisie and **splitting of international revolutionary working class**' असं लेनिननं अगदीं स्वच्छ शब्दांत सांगितलं आहे. (पहाः–क्रित्ता पृ. ३२)



अनुक्रमणिका






या त्यांच्या दृष्टिकोनांतून भारत-चीन संघर्षाकडे पाहतां कांहीं गोष्टी ठळकपणें नजरेस येतात. पहिली गोष्ट म्हणजे भारत हा साम्यवादी देश नाहं. तेथील राजवट 'बुर्झ्वा' (साम्यवादी शब्दकोशांतली ही एक शेलकी शिवी आहे) होय. उलट चीनमध्यें आंतराष्ट्रीय क्रांतिकारक कामगार-वर्गाची हुकमत आहे. आंतरराष्ट्रीय साम्यवादी क्रांतीसाठीं बद्धपरिकर अशी ती राजवट आहे. या दोन देशांत 'शांततामय सहअस्तित्व' अशक्य. तसंच चीननं भारतावर केलेलं सशस्त्र आक्रमण हें 'दुसऱ्या म्हणजे हिंसक' मार्गानें चालविलेलें राजकारण आहे. असें कट्टर साम्यवाद्यांचें हि मत आहे.

कोणताहि प्रामाणिक साम्यवादी खरं बोलायचं ठरवील (आणि ही गोष्ट अतिशयच महत्त्वाची आहे) तर भारत-चीन संघर्षाचं निरूपण असंच करील. तेवढं करूनहि तो थांबणार नाहीं. तो म्हणेल, 'अशा परिस्थितींत म्हणजे एक क्रांतिकारक युद्ध चालू असतांना खऱ्या साम्यवाद्याचं कर्तव्य काय हें देखील लेनिननं सांगितलं आहे!'

'काय सांगितलं आहे?' असा प्रश्न केलात तर वर उल्लेखिलेलंच पुस्तक तो काढील. ३९ वं पृष्ठ उघडील अन् वाचून दाखवील,

'A revolutionary class cannot but wish for the defeat of its Govt. in a reactionary war, cannot fail to see that its military reverses facilitates its overthrow.'

म्हणजे युद्धांत क्रांतिकारक साम्यवाद्यांनी 'त्यांच्या' सरकारचा पराभव व्हावा म्हणूनच प्रयत्न करावयास हवेत. पण तुम्हाला प्रश्न पडेल आणि तुम्ही विचाराल, 'पण कांही हें पुढं लिहिलं आहे...Socialists of all the belligerent countries should wish defeat of all 'their' Governments and express this wish! प्रत्येक देशांतल्या कामगारवर्गानें 'आपल्या' सरकारचा पाडाव व्हावा असं अपेक्षाय काय?'

'हो, पण तें युद्ध साम्राज्यवाद्यांत असेल तर. जर तें क्रांतिकारक युद्ध असलं तर 'बूर्झ्वा' राजवटी खालील कामगारवर्गानें क्रांतिकारक प्रतिपक्षीयांना साद देणं आंतरराष्ट्रीय क्रांतीच्या दृष्टीनं त्याचं कर्तव्य ठरतं.

त्याच्या या बोलण्यावरून साम्यवादी तत्वज्ञानाशीं शंभर टक्के प्रामाणिक राहून केलेलं भारत-चीन संघर्षाचं निरूपण समजतं. अन् ह्या संघर्षाचं सैद्धांतिक स्वरूपहि लक्षांत येतं.

## 'ऐतिहासिक अपरिहार्यते'चा बोध

हें त्यांचे निरूपण लक्षांत घेतल्यावर कांहीं गोष्टी उमजाव्यात. पहिली ही कीं, साम्यवादी राजवटींतील हुकूमशहा किंवा त्यांचे देशोदेशीचे प्रतिनिधि जे कांही बोलतात त्यावरून त्यांच्या विचारांची आणि मनोगतांची परीक्षा करणें चुकीचें आहे. आपण शांततावादी असलों म्हणजे आपल्याला शांतता लाभत नाहीं. 'दोहोंपैकीं एकाचं मृत्युगीत गाईपर्यंत' लोकशाही व साम्यवादी राजवटीत युद्धं होणें अपरिहार्य आहे. आणि त्यासाठींच लोकशाहीवाद्यांनी साम्यवादी राजवटींना सशस्त्र तोंड देण्याची तयारी केलीच पाहिजे.

संगिनी क्रांतिकारक विचारांना थोपवूं शकतात का? असा फसवा युक्तिवाद बरेच वेळां करण्यांत येतो. या संबंधांत एक गोष्ट स्पष्ट लक्षांत ठेवावयास हवी कीं संगीन हातांत धरावयाची ती विचार थोपविण्यासाठीं नव्हे, तर त्या विचारांतून अपरिहार्यपणें निर्माण होणाऱ्या सशस्त्र आक्रमणाला पायबंद घालण्यासाठीं. शिवाय हा विचार जेथें रुजला तेथें तो शस्त्रबलानेंच रुजविण्यांत आला आहे ही गोष्ट-देखील लक्षांत ठेवावयास हवी. लोकांच्या 'मतपरिवर्तना'नें-लोकांनीं निवडून देऊन तो कुठेंच स्थानापन्न झाला नाहीं आणि जेथें स्थानापन्न झाला आहे तेथें निवडीचें स्वातंत्र्यहि ठेवण्यांत आलें नाहीं. तेव्हां वरील युक्तिवाद या ठिकाणीं केवळ अप्रस्तुत होय.

जेव्हां विचार हातांत संगिनी धरून आणि रणगाड्यांवर आरूढ होऊन येतो तेव्हां त्याला वकीली पद्धतीचे युक्तिवाद थोपवूं शकत नाहींत. तो विचार आपल्या अंतिम विजयासाठीं-इतर विचारांच्या विनाशासाठीं -सशस्त्र तयारी करीत असेल तर त्याच्या विनाशाची त्याच प्रकारें तयारी भारताला करावयास हवी.

●●●



*मनांतल्या विचारांनीं तिथैंच पिंगा घातला.*
*तोंडांतून मात्र शब्दहि फुटला नाहीं.*
*माझी इच्छापूर्ति ? मी जात पाहिली नाहीं.*
*गोत पाहिलं नाहीं...............*
*गळ्यांतला हुंदका दाटून आला आणि मी*
*म्हटलें–योगेश... ....................*



—रजनी कर्णिक



'सुलू, उठ हो आतां. कांहीं वेळांतच सूर्य डोकं काढील. खूप कामं पडलीत बघ माझी !' स्वयंपाकघरांतून काम अर्धवट टाकून आई सुलूताईला उठवायला आली होती.

'सुलूताई ' उठ ना ग ! तुझे कपडे सुद्धां नेलेत मोरींत ', छोटी उंर्वशी तिला हलवित म्हणाली.

एक ना दोन कांहीं ना कांहीं कारणानं जो तो सुलू सुलू करीत होता. 'स्वयंपाक–पाण्यापासून आल्यागेल्याची उठबस करण्यांत आईची अगदीं गडबड उडून गेली होती तर आंतबाहेरच्या आणि बाजारांतल्या फेऱ्या घालून बाबा दमून जात होते. पाहुण्यांना आणायला जा, त्यांची खाण्या–पिण्याची सोय बघण्यांत भाऊची गडबड चालली होती. तर आपण कोणती साडी नेसावी न् काय गळ्यांत घालावं ह्यांत उर्वशी रंगली होती. वऱ्हाडी मंडळींतल्या बायका आपसांत मिळेल तिथें बसकण मारून 'अग निलू, तीन कप चांगला कढत चहा पाठव बाई बाहेर, तो किनई अगदीच कोमट लागला हो. ' 'हो नाहींतर काय पहिला चहा कढत नसला न् कीं नाहीं माझं तर बाई अगदीं डोकच चढतं बघा ' अशा तऱ्हेच्या ऑर्डर्सहि सोडत होत्या आणि वर स्वतःचे ताशेरे पण ! त्यांतल्यात्यांत पोक्त असणाऱ्या बायका घरांतीलच अंधाऱ्या खोलींत बसून सासरी कसकसं वागावं हे स्वतःच्या अनुभवाच्या अनुषंगानें सुलूचा संसार सुखी होण्यासाठीं एकावर एक डोस पाजत होत्या. आणि सुलू काय ? मिनिटाला म्हाताऱ्या बायकांचे अनुभव ऐकत, तर दुसऱ्या क्षणीं बसकण मारलेल्या बायकांत गप्पा ऐकत, मध्येंच वडिलांशीं चौकशी करीत, मध्येंच भाऊला दम भरीत अशी वरवर हिंडत होती.

वरून खाली, खालून मांडवांत...आणि आलेल्या वऱ्हाडी मंडळींतही जो तो या ना त्या कारणानें सुळू सुळू करीतच होते.

आदलेच दिवशीं बाहेरगांवचे सारे नातेवाईक जमले. फराळ करण्यांतच बायका रात्र-रात्र जागूं लागल्या. पुरेशी तर राहोच, पण पुरती ३।४ तासांचीहि त्यांना झोपायला सवड मिळेना. उरलेली सारीं कामें आटोपण्याच्या नादांत त्या होत्या. काम आटोपलें कीं आई मोठा श्वास टाकून म्हणायची, 'डोळे बघतात नि हात करतात हो.' रात्रीं ज्याला जिथें जागा मिळेल तिथें तो पडत होता, विसावत होता. दिवसभर खाली–वर, बाहेर खेपा करून आंबलेलं शरीर जमिनीवर टाकून खुशाल ताणून देत होता. कारण लग्नाच्या दिवशीं जास्तच गडबड, जास्तच गोंधळ तेव्हां परत त्या शरीराला ताजेपणा देण्यासाठीं मिळणारी थोडी कां होईना, विश्रांति घेत होता.

सुळूहि अशीच पलंगावर पहुडली होती. बायकांबरोबर खरी म्हणजे तिनेंही जाग्रणं काढलींच होती, थकली होती, तिला तर पटकन् एरवी झोंपही लागावयाची, पण आज कांहीं तिचे डोळे मिटेनात...ह्या कुशीवरून त्या कुशीवर तिची चुळबूळ चुळबूळ चालली होती.

लग्नानंतर सासरी जाणाऱ्या प्रत्येक नववधूची अशीच गत होत असावी कीं काय कोण जाणे! पण ती आपल्या संसाराचा भावी चित्रपट पहाण्यांत रंगून गेलेली, स्वतःच्या विचारांतच गुरफटून गेलेली ही चिरंजीव सौभाग्यकांक्षिणी पाहिली कीं तिच्या हृदयांत कोणती खळबळ माजली असेल, कोणत्या विचारांचे पडसाद उठत असतील याची कल्पना करता येत होती...निदान असं वाटतं तरी...

माझ्या सासरचीं माणसं स्वभावानं कशी असतील? उंबरठ्यावरचं माप ओलांडून मी माझ्या नूतन गृहीं प्रवेश करीन त्यावेळीं माझ्या आगमनानें घराचा कानाकोपरा आनंदानें हसूं लागेल कां? सासूबाई कशा वागतील? दीर माझ्यावर भावाची उणीव भरून, मला माया देऊं शकतील कां? आणि नणंदा...एक ना दोन......आजीनं केलेला उपदेश, मावशीनं सोसलेला छळ......आत्याबाईनीं सांगितलेल्या गोष्टी...सगळ्या एकदम येतात नजरेपुढें आणि जोरांत सुटलेल्या वाऱ्यांत गोल गोल फिरणाऱ्या [illegible] पुन्हां पुन्हां डोळ्यांपुढें फिरूं लागतात...आतां कांहीं तासांतच रात्र संपेल, कोंबडा आरवेल आणि शुभ दिवसाची वार्ता सांगेल. सुवासिक उटण्यांनी, तेलांनीं मंगलस्नान करण्यापूर्वी सूर्य वर येईल. आपल्या सुवर्ण किरणांनीं मला न्हाऊं घालत म्हणेल, 'चल, आतां तुझं घर बदललं, तूं बदललीस तरी मी तुला असंच न्हाऊं-माखूं घालीन' ...सकाळचा गोड वारा घुमत कानाशीं येऊन म्हणेल, 'लग्नाच्या सनईचे सूर एकवेळ विसरशील पण माझ्या गोड गाण्याचे सूर...' ? घर सोडतांना अंगणांतील हीं झाडें आंबा, बकुळ, प्राजक्त, सोनचाफा, मोगरा, प्रत्येक जण मला भेटून जाण्यासाठीं हात करून जवळ बोलावतील, आंब्यावर रोजच्यारोज नियमितपणें येऊन बसणारे पक्षी, सोनचाफ्यावरच्या चिमण्यांचा पहाटेचा किलकिलाट त्या दिवशीं जास्तच ओरडा करतील आणि मग मला निरोप देतील. अंगणांतली सारवून स्वच्छ उभी असलेली तुळस आईपेक्षांहि जास्त दुःखी दिसेल...पण तरीहि या साऱ्यांचा निरोप मला भरल्या डोळ्यांनीं घ्यावाच लागेल. घराची ओढ, मनाची ही हुरहूर कांहीं आजच्या आज संपणार नाहीं...ही हुरहूर, ही ओढ कांहीं दिवस तरी अशीच राहील.'

सुळूताईची चुळबूळ कमी झाली त्याचवेळीं आई तिला घाई करून उठवीत होती...झालं. मंगलस्नान झालं, लग्न झालं. वरात निघाली आणि प्रत्येकाच्या–मोठ्यांच्या पाया पडत पडत, 'कन्या सासुऱ्यासी जाये। मागें परतोनी पाहे चुकलीया माये। बाळ हुरूहुरू पाहे ॥ याचा अनुभव घेत घेत सुळू सासरां गेली सुद्धां!

सुळूताईचं लग्नं जमलंहि पटकन् अन् उरकलंहि झटकन्! मुलीला जशी चार ठिकाणीं दाखवून पसंत करतात तशाच पद्धतीनं जमलं. पहिला मुलगा तिनेंच नाकारला पण पाठचा आला तोच सरस वाटला. आणि दहा दिवसांपूर्वी ध्यानीमनींहि नव्हतं तें एवढं मोठं कार्य उरकून घरांतील मंडळी झालेल्या गोष्टींवर चर्वीतचर्वण करीत बसली. राहिलेली जेवणं-खाणं, उरलेला फराळ यांतच चार दिवस सरले आणि आलेलं वऱ्हाड आपापल्या स्थानीं परतलं.

सुळूताईच्या लग्नानंतरची तीन–चार वर्षे हां हां म्हणतां उडाली. मध्यंतरीच्या काळांत भाऊसाठीं अनेक वधुपिते घरीं येऊन गेले. आईनें व त्यानें त्यांच्याकडील चहा फराळावर ताव मारीत सावकाशपणीं त्यांना नकार पाठवले व कांहीं दिवसांनीं शेजारच्याच बिल्डिंगमधली पुष्पा देशपांडे आमच्या घरांत माझी वहिनी होऊन आली.

सुळूताईच्या लग्नांतच मी चांगली वीस वर्षांची होते. आज तर मला चोवीस वर्षं पूर्ण होऊनही गेली. पण सुळूताईसारखी दाखवून घ्यायला मात्र माझ्या मनाची मुळींच तयारी नव्हती. माझ्या नशिबानं म्हणा माझ्या ऑफिसांत आलेला आसिस्टंट मॅनेजर योगेश आयत्या वेळीं आला नसता तर चार-चौघांसारखेंच मलाहि मूग गिळून प्रदर्शनांत कठपुतळीसारखं उभं रहावंच लागलं असतं. पण सुटले. सुटले कुठची? जास्तच अडकले.

कारण योगेश होता हरिजन आणि मी होते ब्राह्मणाच्या घरची! ब्राह्मण मुलीनें एका हरिजन मुलाला वरणं म्हणजे माझ्या आई-वडिलांच्या दृष्टीनें फार मोठा गुन्हा ठरला असता. घरांत तर बोलून उपयोग झालाच नसता आणि उगाच वाद वाढून विपर्यास मात्र घडला असता. कांहीं महिने आम्ही असेच चूपचाप काढले. मी योगेशला खोली घेण्यासाठीं आग्रह करीत होते. कारण त्याचं घर होतं खेड्यांत! मी घरीं गप्प बसलेली म्हणून त्यानेंहि तोंडाबाहेर शब्द काढला नाहीं...आणि आतां त्याला खोली मिळाली. दोन-तीन महिने धडपडून...!

कांहींहि करून या धाडसांतून पार पडायचं अंगावर तर घेतलं. दिवस ठरविला. दसरा...! हो याच दिवशीं एक उंबरठा ओलांडायचा आणि दुसऱ्यावरून आंत जायचं. पण जमायचं कसं हे? नाना विचार, मधाच्या पोळ्याभोवती घोंघावणाऱ्या माशांसारखे, डोक्यांत घोंगावत. त्यांना परतून लावताहि येत नव्हतें. राहून राहून सुळूताई, भाऊच्या लग्नाचा सोहळा जसाच्या तसा डोळ्यासमोर येई आणि उगीचच मनाला रुखरूख लागून राही. हुरहूर वाटे.

सुळूचं लग्न आई-बाबांनी किती आनंदानं केलं, उत्साहांत पार पाडलं नि आतां मात्र... बाबा धक्का घेतील, आई कातावेल, उर्वशीचं लग्न कसं होणार म्हणून बोल लावतील...

सुळूच्या लग्नांतली वाजंत्री ऐकलेली पुनश्च आठवावीत. मनानं सांगावं, 'आईला कळल्यानंतर ती घरांत भांड्यांची आदळ–आपट करेल तीच तुझ्या लग्नाची वाजंत्री, बाबा बडबडतील तेच मंत्र, भाऊ चिडून अंगावर वस्तु फेकेल त्याच मंगलाक्षता, डोळ्यांतून गळणाऱ्या आसवांनी वहिनी तुझ्याकडे पाहिल. त्याच

तुझ्या मुंडावळी...तरीहि मन धरूच घेलं. जाताना आई-बाबांना निलू सासरी जाते आहे असं जरासुद्धां भासलं न पाहिजे.

नववधूचा हिरवा चुडा, अष्टपुतळी, कोऱ्या साड्या, दागिने, मुंडावळी, मांडव, फराळ, वऱ्हाड ह्यांतील कांहीहि...छेः कोणतीच वस्तु मला लाभणार नव्हती. पण तरीसुद्धां मी संसार करायला जाणार होतेच ! माझ्या आशांची पूर्तता करणाऱ्या योगेशबरोबर...

योगेशाची न् माझी गांठ पडली तो दिवस आजही मांझ्या चांगलाच स्मरणांत आहे. ऑफीसला जाण्यासाटीं मी 'बी' रूटवर उभी होते. ऑफीसला जातांना कधींकधीं माझी भयंकर धांदल होई. त्या दिवशीं होळीपौर्णिमा होती. मी तयारी करीत असतांनाच धांवत धांवत उर्वशी आली न् सुटे पैसे दे म्हणून सांगूं लागली. मी बाथरूममधून ओरडून पर्समधून घे असें सांगितलें. त्या पट्टीनं पाकीट बाहेर काढलं, पैसे घेतले न् पाकीट मात्र आंत टाकायला जाम विसरली. मी घाईनें बसमध्यें चढले आणि तिकीट काढण्यासाटीं पर्स उघडली...एकदां पाहिलं दोनदां पाहिलं आणि चेहरा पांढरा फटक पडला...पाकीट नाहीं...कंडक्टर तर तिथेंच उभा ! समोरच्या सीटवर बसलेल्या योगेशच्या ताबडतोब ध्यानांत आलं. त्यानें कंडक्टरला बोलावलें आणि मला फक्त 'कुटचं तिकीट ?' इतकेंच विचारलं. मी चांचरतच, शरमेनें बस स्टॉपचं नांव सांगितलं. त्याला 'थँक्स' म्हणणंहि त्यावेळीं आटवलं नाहीं. बस स्टॉपवरून अगदीं घाईनच ऑफिसमध्यें आले. आमच्या मुलींच्या ग्रुपमध्यें तर माझी फजिती मी होऊनच सांगितली. एरवी माझ्या स्मार्टपणांत खोड काढायला जागा नसल्यामुळें आज माझ्या वेंधळटपणाचा हा प्रकार पाहून प्रत्येकीनं तोंडसुख घेतलं. त्यांतल्या त्यांत किशी होती जास्त खवचट. तिनं विचारलें,

'काय ग निलू, तुझं तिकीट कोणी काढलं मग ?'

'स्त्री-दाक्षिण्य दाखवणाऱ्या एका माणसानं !' मी उत्तर केलं.

'हं...' किशीचा आवाज जड झाला होता. ए, पण तो कसा होता सांग तरी निदान...'

'ऐक किशे, उंची मोजली असती तर निदान ५ फूट साडेदहा इंच भरला असता. वजन निदान १६२ पौंड असेल. रुंद, भरदार, काळे डोळे, चांगल्या भरघोस मिशा आणि ऐटींत ठेवलेली दाढी—...'

किशीला मध्येंच लहर आली, ' अग पण वय काय ? दाढी-मिशावाला म्हणजे बहुतेक पन्नाशी उलटलेला—'

'चांगला तिशींतला !' आतां बोल.'










'अस्सं–' मघापेक्षां जोर देऊन किशी मिस्किलपणें हंसली.

'हें बघ किशे, अग त्याच्या रुबाबावरून आपले असे नये सात पैसे तो येतां जातां दान करीत असेल असं वाटलं. आज त्याच्या दानांत ह्या तीन नया पैशांची भर...! फार कांहीं चाट नाहीं बसली त्याच्या खिशाला...'

त्यानंतर मी किशीकडून उसने पैसे घेतले न् कामाला लागले. दोन–तीन तास केव्हांच संपले आणि लंचच्या अगोदर पट्टेवाला आला बोलवायला.

'बाई, साहेबांनी ९३४२ नंबरची फाईल घेऊन बोलावलंय.'

फाईल घेऊन मी निघाले. आजपासून नवा मॅनेजर कामावर आहे हें सुद्धां मी पार विसरून गेले आणि समोरच्या खुर्चीत योगेश ! त्यानें मला येतांना पाहिलं होतं म्हणा, किंवा कांहीं कारणानें असेल, त्याला आश्चर्य वाटलं नाहीं. पण माझी क्षणभर जी काय त्रेधा झाली...किशी मेली डोळे फाडून माझ्याकडे पहात होतीच...

त्यानंतर कांहीं दिवसांतच योगेश मला त्याच्या टेबलवरचीं अनेक कामें सांगू लागला. मीही उरकूं लागलें. आणि मग नेहमीं जें होतं तेंच...फिरायला जाणं, सिनेमा, चौपाटी...वगैरे वगैरे. पण योगेशबरोबर फिरायला जाण्यापूर्वीच त्याच्या–माझ्यांत बोलणं झालं होतं. आणा–भाका म्हणतात त्याही दिल्या होत्या. प्रश्न होता फक्त लग्नाचा !

ऑफीसमध्यें बातमीची सांथ कोणत्याहि रोगाच्या साथीपेक्षां वेगानें पसरते. आमचं ऑफीस कांहीं याला अपवाद नव्हत ज्याच्या त्याच्या तोंडीं कितीतरी दिवस तोच विषय ! तीच थट्टा !

योगेशनं मला लग्नाबद्दल विचारलं त्यावेळीं मी त्याला फक्त माझी एक इच्छा सांगितली. त्यानं विचारलं,

'लग्नाच्या दिवशीं तुला गळ्यांत काय घालूं !'

'तुझे हात...'

'तुला मनांत चांगली फुल कोणती देऊं !'

'तुझे दोन हंसरे डोळे.'

'साडी कशी घेऊं ?'

'सुदैवाची घडोत.'

'तूं नीट बोलणार आहेस कीं नाहीं निलू ? माग तुला काय हवं तें...'

'मला फक्त एक गोष्ट हवी. योगेश ! उंबरठ्यावर माप...तेवढं माप पायानं उलथून मगच तुझ्या घराचा उंबरठा ओलांडावा अशी इच्छा आहे, आणशील तेवढं !'

'हां हां अगदीं अवश्य...'

लाडकें 'Fool–'



'खरंच लाडके ! मी तुला अगदीं 'एप्रिल' फुलासारखं जपतो !'

आणि आतां तेंच माझं लग्न उद्यांवर येऊन ठेपलं होतं. कांहीं तासांचाच अवकाश. सुरुताईची धुंदीनं, बेचैनीनं झोप उडाली होती, माझी काळजीनं...

नेहमीच्या सरावानं येणारा दसरा उजाडला. आई लवकर उठली होती. दाराला लावायला तोरणं करत होती. मी हि उठून तिला मदत केली. श्रीखंड तयार करून दिलं. साडेबारा वाजतां पानं घेतलीं, रांगोळ्या घातल्या. सारं कांहीं यथासांग पार पाडला सण ! पण दुपारी ह्या...

नवी साडी नेसले कशीबशी. नेहमीसारखा शेपटा सोडला, रोजच्याच दोन बांगड्या चढविल्या, रिंग अडकवल्या आणि आईला दिली थाप कीं मैत्रिणीकडे जातें, यायला उशीर होईल, काळजी करूं नको...

रजिस्टर्ड–पद्धतीनं आमचा विवाह उरकला. अगदीं शांतपणें...त्याचे चार मित्र आले होते. माझ्या पांच मैत्रिणी. बस्स !

योगेशच्या खोलीवरही दोघे पुढें गेले होते. अक्षद–पाणी आमच्यावरून ओवाळून टाकण्यासाठीं! मी अन् योगेश खोलीपर्यंत पोहोंचलों.

आणि आंत जाण्यासाठीं माझा पाय न उचलेना. आईपासून लपवून ठेवलेलें, वडिलांना न दाखवलेलें, भाऊपासून दडवलेलें डोळ्यांतलें पाणी टचकन् येऊन उभें राहिलें. आर्त नजरेनें मी योगेशकडे पाहिलें. माझी नजर विचारीत होती...

'काय हें योगेश, अरे, नूतन वधूची पहिल्या दिवसाची इच्छा तुला पुरी करतां येऊं नये ? इतर साऱ्या सोहोळ्यांत तुला एक माप आणतां येऊं नये ? काय करायचाय हा कोपऱ्यांतला फ्लॉवर पॉट् ? कशाला हव्या होत्या इतक्या नव्या साड्या ? माझी इच्छा पूर्ण करण्यासाठीं 'अवश्य' 'अवश्य' म्हणून जोरानें मान हलवण्याची काय जरूर होती? योगेश, त्या मापांतल्या प्रत्येक दाण्यानिशीं माझ्या डोळ्यांतून अश्रू बाहेर पडतील आणि विचारतील, झाली तुझी इच्छापूर्ति ? जात पाहिली नाहीस, गोत पाहिलं नाहीस...आणि त्या तुझ्या पतीला तुझी क्षुल्लक इच्छा...पण ती सुद्धां–निदान माझ्या भावनांचा तरी विचार...'

मनांत गर्दी केलेल्या विचारांनीं तिथेंच पिंगा घातला. तोंडांतून मात्र शब्दही बाहेर पडला नाहीं.

गळ्यांत दाटलेला हुंदका. मात्र यावेळीं एकदम बाहेर पडला आणि मी म्हटलें,

'योगेश माप...माप ?'

माझ्या डोळ्यांतील अश्रूंचा, माझ्या हुंदक्याचा अर्थ त्याला ताबडतोब कळला आणि माझ्या हातात धरलेला हात पटकन् हिसडून शेजारच्या खोलीत माप आणण्यासाठी योगेश धांवला...






# ज्योतिषी



—अनंत तडवळकर

**मळकट** धोतर, त्यावर मांजरपाटाचा शर्ट, शर्टावर काळें जाकीट, डोक्याला पांढरी टोपी आणि कपाळाला पांढऱ्या गंधाचा टिळा अशा नेहमीच्या वेषांत विठ्ठल जोशी घराच्या दारांत आला. फाटक्या चपला पायांत सरकावून घराबाहेर पडला. टोपी किंचित् तिरकी करीत चालूं लागला.

गेले दोन महिने तो शिंप्याचा व्यवसाय शिकत होता. खूप विचार करून त्यानें हा धंदा करायचें ठरवलें होतें. बापजाद्यांच्या पिढीजात धंद्याला पहिली ठोकर मारणारा तो पहिलाच होता. मुळांतच त्याला गोंधळ्याचा व्यवसाय आवडत नव्हता. लग्नाकार्यांत गोंधळ घालणें, थोडेंबहुत भविष्य सांगत फिरणें आणि असलीच तर शेती करणें हा त्याच्या वाडवडलांचा जीवनक्रम त्याला पसंत नव्हता. शेतीची आवड असूनहि उपयोग नव्हता. कारण विठ्ठलच्या बापानें आपला एकुलता एक जमिनीचा तुकडा केव्हांच फुंकून टाकला होता. म्हणूनच विठ्ठलनें ठरविलें होतें, तो गोंधळ घालणें नको आणि भविष्य सांगत फिरणें नको. शिंप्याचा धंदा बरा. त्यासाठींच तो आठवड्यांतून दोन दिवस तालुक्याला जात असे आणि आपल्या 'पाव्हन्याकडून' शिवणकामाचे धडे घेत असे. गेल्या दोन महिन्यांत त्याला सदरा, चड्डी, विजार बेतून शिवण्याइतपत ज्ञान आलें होतें. आतां आणखी दोन महिने गेलें कीं कर्ज काढून तो स्वतःचें मशिन घेणार होता.

पण तूर्त तरी पोटासाठीं कांहीं करणें भाग होतें. न आवडणाऱ्या ज्योतिष्याच्या ज्ञानाचा आश्रय घेणें भाग होतें. कधीं खरें, कधीं खोटें ठरणारें भविष्य सांगणें क्रमप्राप्त होतें. घरांत गाडग्या मडक्याचा, पत्र्याच्या काळ्या डब्यांचा खडखडाट ऐकूं न येण्यासाठीं तरी कांहीं करणें आवश्यक होतें.

तसा तो चांगलाच गोष्टीवेल्हाळ होता. आडव्या तिडव्या गप्पा मारण्यांत तरबेज होता. आपलेंच म्हणणें खरें करून दाखवण्याइतपत, पटवून देण्याइतपत शहाणा होता. आणि म्हणूनच तो गांवांत तग धरून होता असें म्हटलें तरी चालण्यासारखें होतें.

घरांतून बाहेर पडल्यानंतर विठ्ठल थेट काका हवालदाराच्या मळ्यांत येऊन पोहोंचला. काका उंसाला पाणी देत होता. भसाड्या आवाजांत तोंडाला येईल तें गाणें म्हणत मोट मारीत होता.

मळ्यांत शिरायच्या आधीं विठ्ठलनें हांक मारली, 'काकाऽवं काकाऽ—'

'कोन रं ?'

'मी हाय जी इट्टल जोशी.'

'ये की रं.'

'कुतरं हाय न्हवं ?'

'काय करत न्हाई. ये.'

दबकत दबकत विठ्ठल मळ्यांत शिरला. मोटेच्या तोंडाशीं जाऊन तहान नसतांनादेखील दोनचार ओंजळी पाणी प्यायला. हात धोतराला पुशीत उभा राहिला.

'हिकडं कुठं आल्लास ?'

'हेच आपलं—निवर्तीच्या मळ्याकडं.'

'आं ? तिकडं कशाला रं ?'

विठ्ठलनं जाणूनबुजून काकाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें आणि तो उंसाकडे एकटक बघत राहिला. असा बघत राहिला कीं काकानें पुन्हा विचारलें,

'काय बघतोस तिकडं ?'

विठ्ठलनें काकाकडे नजर वळवून म्हटलें, 'ऊंस लई जोसांत दिसतोय—'

काका मिशींत हसला. तें बघून विठ्ठल पुढें बोलूं लागला.

'लई मेहनत घेतली आसंल—'

अनुक्रमणिका

*शिंप्याचा व्यवसाय करावा म्हणून खूप विचार करून तो शिंपीकाम शिकला. कर्ज काढून तो शिलाईचें मशीनहि घेणार होता, पण अचानक त्याला एक गुरुकिल्ली सांपडली आणि*

.............................................................

'मंग ? मेहनतीशिवाय खुटं पीक येतंय व्हय ? '

काका खूप झालेला बघून विठ्ठलला जोर चढला. तों आणखी निरखून उंसाकडे पाहूं लागला. दोनचार मिनिटें हिंडून पाहून झाल्यांवर तो परत काकाकडे आला.

'काका, खरं सांगू ? '

'सांग. '

'पर नको. उगं तुम्हांला वाटंल मी आपलं खोटं कायतर सांगतोय. '

'च्या मारी ! काय हाय सांग तर आधीं ! '

'सांगतो कीं. आत्तां हिकडं येतांना निवर्तींचात्री ऊंस बगून आलों मी. '

'फुडं ? '

'पर तुमच्या उंसासारखा काय दिसला न्हाई त्यो. '

काकाची छाती दोन इंचानं फुगली. तो गालांतल्या गालांत हंसला.

'कसा दिसंल त्याचा ऊंस माझ्या उंसासारखा ? अरं त्याला मेहनत करावू लागती, येळच्या येळीं पानी द्यावू लागतं— '

काकाचें चऱ्हाट लांबत जाणार हें बघून विठ्ठलनें तें मधेंच तोडलें.

'कंदी लावला ऊंस ? '

'झाले कीं चार म्हयने. कां रं ? '

विठ्ठलनें जाकीटाच्या खिशांतून घडी करून ठेवलेलें पंचांग काढलें. पानें उलटतां उलटतां तो मधेंच थांबला.

'दिस आटवतोय कां ? ' त्यानें विचारलें.

'व्हय कीं. बुधवार हुता. '

'झालं ! ' विठ्ठल एकदम खालींच बसला. काका हवालदार घाबरला.

'काय झालं रं ? दिस चांगला न्हवता कां ? '

'न्हाई. तसा चांगला हुता. पर त्या हप्त्यांत गरह चांगले न्हवते. तसा हिशेब केला तर ह्या दोन म्हयन्यांत थोडा धोका हाय–'

'कसला धोका ? ' काकानें घाबरून विचारलें.

'काय तर रोगबीग पडंल. पर घाबरूं नगा काका. सांच्याला या घराकडं. तांदूळ देतो ते टाका उसांतनं.'

'खरं म्हणतोस ? '

'व्हय जी. खोटं कशाला सांगूं ? पर इस्वास हाय न्हवं तुमचा ? '

'तर बात्रा ! हाय इश्वास. दे तांदूळ. रातच्याला येतो. '

विठ्ठलाने मग तांदूळ कसे, कुठल्या दिशेनें टाकायचे, कुठल्या वारीं टाकायचे आणि कोणत्या वेळीं टाकायचें तें सांगितलें. ह्या गोष्टीची कुठं वाच्यता न करण्याबद्दल बजावलें. काका खूप झाला. त्यानें विठ्ठलला मोबदला काय द्यायचा तें विचारलें.

'हां हां. या गोष्टीबद्दल काय द्यावं तें इचारूं नगा हां. आतां खुषीनं काय जवारी, दाळ देनार असाल तर न्हाई म्हनत न्हाई.' विठ्ठल म्हणाला.

'मंग जवारीच देतों. किती दिऊं ?

'द्या आतां तुमीच समजून.'

'दोन शेर दिऊं ?'

'नगं काका. न्हावूं द्या. तसंच करतो मी काम. उगं ते दोन शेर घिऊन अडजीभ पडली, पडजीभ थोंबलली असं व्हायू नको—'

'मंग पायलीभर देऊं ?'

'नगं काका, काय दिऊं नका. मी तसंच करतो काम.'

'बरं; आतां जास्ती मागू नगंस. दोन पायली आनून देतो सांच्याला. चाललं कां ?'

'द्या आनून.'

विठ्ठल तिथून निघाला तो थेट काशिनाथ दोडकेच्या शेतावर येऊन पोहोचला. काशिनाथ दोडके हा विठ्ठलचा शाळेंतला दोस्त. दोघांनीहि चौथी-पांचवीपर्यंत 'भरपूर शिक्षण' घेऊन शाळा सोडली होती. समवयस्क असल्यामुळें विठ्ठलला त्याच्याशीं बोलण्यांत संकोचबिंकोच कांहीं नसे. कुठल्याहि गोष्टीवर ते दोघे मोकळेपणानें चर्चा करीत असत.

आतां देखिल विठ्ठलला बघून काशिनाथ हरखला. बसल्या जागेवरूनच त्यानें आरोळी ठोकली,

'या ज्योतिषी म्हाराऽज—'

विठ्ठल हसला. हसला आणि काशिनाथ जवळ बांधावर बसला.

'आज हिकडं कुटं सवारी ? ' काशिनाथनें विचारलें.

'आलतो जरा आपल-त्या हवालदाराकडं. '

'कोन हवालदार ? काका हवालदार ? '

'व्हय, जरा काम हुतं पारव्हेट. '

'कसलं काम ? '

काशिनाथ जास्ती खोलांत शिरूं लागल्याचं पाहून विठ्ठलनें विषय बदलला.

'हिरीचं काम कुठवर आलं तुझं ? '

'चाललंय. तीस फूट खोदून झालंय—'

'अजून पानी लागलं नसंल ? '

'न्हाई—'

'कसं लागंल ? मी तवाधरनं सांगत हुतो तुला, का बाबा, जागेची पुंजा कर, गरह चांगले न्हाईत—'

'पुंजा केल्ली कीं जागेची. कापूर लावून नारळबी फोडला हुता कीं—'

'अरं पर शांती केल्ली कां गरहाची ? '

'तसलं काय ठावं न्हाई आपल्याला. आपला त्यावर इस्वास न्हाई. पुंजा क्येली, नारळ फोडला, काम झालं—'

काशिनाथ कांहीं दाद देत नाहीं हें पाहून विठ्ठलला थोडं पराभव पावल्यासारखं झालं. त्यानं दुसरा पवित्रा टाकला.








'तुला काय तसलं कराचं नसलं, करूं नगा. पर पानी लागलं कां बग !'

'बगतो कीं. अजून चार फूट खांदलं, का लागल पानी.'

'वाट बगा पान्याची.' आणि तो कुठलीशी बनावट हकीकत सांगूं लागला, 'खोपडे ठावं हाय का आंबेगांवचा ?'

'कोन खोपडे ?'

'आंबेगांवचा त्यो लांबट मानेचा. मागं गेल्तो एकदां मी तिकडं. परत येतांना वाटंत पाव्हन्याच्या मळ्यांत पानी प्यायला गेलों. थितं ह्यो खोपडे भ्येटला. सांगत व्हता का बत्तीस फूट हीर खांदली पर अजून पान्याचं नांव न्हाई. मी इचारलं, का बाबा, कवा खांदायला सुरवात क्येली. त्यानं येळ सांगितली. मी बोललों, अमुक अमुक पुंजा करा. गरहाची शांती करा. फायजे तर सामान माज्याकडं द्या मी करतो समदं. तासांत त्यानं सामान दिलं. मी पुंजा करून शांती क्येली आनि तिसऱ्या दिवशीं पानी लागलं.–'

'कसली शांती क्येलीस ?'

'आतां काय नीट आटवत न्हाई. पर तुजं मातर बगून घ्ये. मागनं म्हनशील मी सांगितलं न्हाय म्हनून.'

'पन—'

'माजं आपलं मत हाय. समदे इलाज करून बघावं आनि मग बोलावं. मागनं वाटाय नगं, का बाबा, हें न्हायलं हुतं म्हनून आसं झालं.

'मंग शांती करावी म्हन्तोस ?'

'आतां तुजं तूं बग. इस्वास नसला तर तें करन्यांतबी काय अरथ न्हाइ.—'

'तूं कर. काय व्हायाचं आसंल त्ये हूं दे. किती खर्च यील ?'

'अंदाजानं घे तूं.'

'आट आने दिऊं ?'

'कशाला देतोस त्यवडे तरी ? उगं यवडं त्यवडं करून काम भागवनाऱ्यांतला न्हाई मी. क्येलं तर समदं येवस्थेशीर करनं—'

'रुपया घे मग.'

विठ्ठलनें एकदां त्याच्याकडे पाहिलें आणि वैतागलेल्या स्वरांत तो म्हणाला,

'मी सांगूं का काशिनात ? करूं नगंस तूं काई. उगं तुजा नि इस्वासबी न्हाई आणि—'

'अरं किती फायजेत सांग कीं ! यवडा खर्च झाला हाय. त्यामधीं हें काम. उगं काय न्हाऊन गेलं असं व्हाय नगं. किती दिऊं ? दोन रुपै दिऊं ?'

'दे.'

दोन रुपयांची नोट खिशांत टेवीत विठ्ठल उठला. काशिनाथाचा निरोप घेऊन त्याच्याच शेतांतल्या पायवाटेनें तो गांवाकडे निघाला. गांवांत पोहोंचल्यानंतर घराकडे न वळतां पाटलाच्या घरांत शिरला.

पाटील ओव्यावरच बसला होता. विठ्ठलला पाहतांच ओरडला,

'या महाराजंत. लई बरोबर सांगितलं भविष्य.'

'काय झालं जी पाटील ?'

'काय व्हायाचं हाय ? आयका थोडं.'

पाटलाच्या घरांतून–लहान मुलाच्या रडण्याचा आवाज येत होता.

'काय झालं? पोरगा का पोरगी ?'

'पोरगा झाला हाय, पोरगा'

'काय सांगितलं होतं मग मी ?'

'तूं पोरगी हुईल म्हनून सांगितलं हुतं आं. आतां शब्द फिरवूं नगं.'

'परं पाटील, मी पोरगी होनार आसं कुटं बोललों हुतों.'

'बोलला हुतास. म्हनलास का शणीची पुंजा केल्याबिगर मुलगा न्हाय होनार. खुटली पुंजा आनि काय ? कायबी न करता झाला कीं न्हाय मुलगा ?'

विठ्ठलचा चेहरा प्रफुल्लित झाला. नीट सावरून बसत तो म्हणाला,

'म्हंजे माजंच बरुबर हाय कीं वो !'

'अजून तुजंच बरुबर कां ? पडलं तरी नाक हायेच का अजून वर ?'

'हां हां. हाय वर. आतां आसं बोला, गेल्या शणवारीं तुमी खुटं गेल्ता ?'

'पाव्हन्याच्या गांवाला !'

'थितं गेल्यावर पाव्हने भ्येटल्ये कां ?'

'न्हाई.'

'मंग तुमी परत आला का न्हाई ?'

'आलों.'

'जातांना तुमी जेवून गेल्ता का ?'

'न्हाई.'

'आनि येतांना बी जेवन न्हाई. हितं आल्यावर त्येवडं रातरीं जेवला. व्हय का ?'

'व्हय.'

'मंग समंध दिवस शणवार घडला का न्हाई ?'

'व्हय की रं !' पाटील बोलून गेला.

'म्हंजे झाली का शणीची पुंजा ? माजं भविष्य खोटं नाय ठरनार पाटील.'

पाटील गप्प झाले. विठ्ठलचं सगळं म्हणणं जरी नीट पटलं नाहीं तरी त्याचंहि खूपसं बरोबर होतं. आपल्याला शनिवार घडला हें त्यांना मान्य होतं. त्याबरोबरच आपण गांवाला जातांना आणि परत येतांना वाटेंतल्या मारुतीला नमस्कार केल्याचंहि त्यांना आठवलं.

'तसं तुजं बी बरुबर हाय म्हना—' ते चांचरत बोलले.

'म्हंजे पटलं की तुमाला.'

आपली बाजू पडली हें पाहून पाटलांनीं विषय बदलण्याचा प्रयत्न केला.'

'जाऊं दे सोड.'

'जाऊं दे कसं पाटील ? आता न्हाय सोडनार. पोरगा झाला हाय तुमाला, माजं भविष्य खरं झालं, आतां काय देनार त्येच्याबद्दल बोला !'

पाटील खुषीनं हंसला. हंसला आणि म्हणाला,

'आसं म्हन्तो होय ? बाऽरं. काय दिऊं ? रुपाया दिऊं ?'

'नग पाटील. कायतरी जवारीगिवारी द्या. लई आबदा चालली हाय बगा घरांत. रुपाया घिऊन काय करूं जी ? काय धान्य दिलं तर चार दिस पोटाला हुईल—'

आणि थोड्यावेळानें पाटलानें दिलेलें धान्याचें बोचकें पाठीवर टाकून विठ्ठल घराकडे चालूं लागला. ●●●



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# विठ्ठल भाऊजींचा सल्ला



—विठ्ठल रामजी भाटकर

**वाचकहो !** ‘ कमला वहिनींचा सल्ला ’, ‘ विमला काकूंचा सल्ला ’, ‘ प्रमिला मावशींचा सल्ला ’ अशा प्रकारच्या मथळ्याचें वाचकांना एखाद्या विशिष्ट अगर विविध विषयांवर सल्ला देणारें सदर बऱ्याच अंकांत असतें. आम्हीं ‘ विठ्ठलभाऊजींचा सल्ला ’ या मथळ्याखालीं हें सदर प्रसिद्ध करीत आहोंत. कल्पनेंतल्या वाचकांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें प्रसिद्ध करीत आहोंत.

१. गोविंदराव गणपुले, गिरगांव.

आमच्या हिची आई ‘चार दिवस’ राहण्याकरतां म्हणून आली ती आतां चार ‘ महिने ’ झाले तरी हलायला तयार नाहीं. गुळाला डोंगळा चिकटावा तशी चिकटून बसली आहे. सारे उपाय करून पाहिले. मोटमोठ्यानें गाणें म्हटलें, मित्रांना बोलावून घरांत हैदोस घातला, बायकोशीं मोटमोठ्यानें भांडून अप्रत्यक्षरीत्या सुचवून पाहिलें, पण रामा शिवा गोविंदा. गुळाला डोंगळा चिकटावा तशी चिकटून बसली आहे. कांहीं जालीम उपाय सुचविल्यास आभारी होईन.

गोविंदराव गणपुले यांस,

असं पहा, गोविंदराव, अशा प्रकारच्या प्रत्येक कजाग बाईचा कांहींतरी Week point असतो. कुठल्यातरी विशिष्ट प्राण्याला त्या घाबरत असतात. सर्कशींत सिंहाच्या तोंडांत मान देणारी एक बेडर बाई झुरळ पहातांच किंकाळी मारीत असे. तुमच्या सासूबाई कुठल्या प्राण्याला भितात तें शोधून काढा. कुठल्याहि प्रकारचे प्राणी मिळण्याचें एक दुकान फोर्टमध्यें आहे. तेथून ते खरेदी करून अगर दुसरीकडून ते मिळवून रोज थोडे थोडे घरीं नेऊन घरांत सोडा. सासूबाई एक दोन दिवसांतच गाशा गुंडाळतील. हा उपाय अगदीं जालीम आहे. लागू न पडल्यास कळवा. आणखी जालीम उपाय सुचवूं.

२. गोपाळराव बिनलग्ने, दादर.

मी एक चाळीस वर्षांचा प्रौढ ब्रह्मचारी आहे. मारुतीची उपासना करतो. रोज सकाळीं मुखमार्जन वगैरे आटोपून दूध पिऊन झाल्यानंतर मी दारांतच आरामखुर्ची टाकून वर्तमानपत्र वाचीत बसतों. नेमकी याचवेळीं शेजारच्या बंडोपंतांची बायको केर काढीत काढीत बाहेर येते. ती असें मुद्दाम करते कीं अजाणता करते मला कल्पना नाहीं. केर काढतांना वांकलेली असल्यामुळें तिचा पदर खालीं पडलेला असतो आणि ब्लाऊजच्या वरच्या पोकळींतून तिचा तो पुष्ट कीं काय म्हणतात तो वक्षभाग माझ्या नजरेस पडतो. आतां माझा मनावर संयम असल्यामुळें याचा तात्कालिक कांहीं परिणाम झाला नाहीं तरी तो प्लॅटॉनिक कीं कोण म्हणतो त्याप्रमाणें तें सारें माझ्या सुप्त मनांत जाऊन ठसतें व मग रात्रीं लैंगिक स्वप्नें पडतात. हा प्रकार रोज चालतो. यांतून कांहीं मार्ग सुचवाल अशी आशा आहे. प्रश्नाचें उत्तर मासिकांत प्रसिद्ध न करतां खाजगी रीतीनें पाठविण्यास आपली कांहीं हरकत आहे काय ? त्याबद्दल आपली कांहीं फी असल्यास देण्याची माझी तयारी आहे.

गोपाळराव बिनलग्ने यांस,

गोपाळराव, रोज सकाळीं मी आपल्या घरीं येऊन आपल्या दारांत आरामखुर्ची टाकून वर्तमानपत्र वाचीत बसलो तर आपली कांहीं हरकत आहे का ? त्याबद्दल आपली कांहीं फी असल्यास देण्याची माझी तयारी आहे.

३. अप्पासाहेब देशपांडे, सोलापूर.

कांहीं दिवसांपूर्वी मी आंघोळ करून बाहेर गॅलरींत येऊन उभा राहिलो. अशा वेळीं कांहींतरी गाणें म्हणण्याची मला संवय आहे. त्या दिवशीं मी—

थांब खाली उतर, परत जा, परत जा !
क्षुद्र जीवा तुझा गर्व वायां !

या कुठल्याशा कवीच्या एका कवितेच्या दोन ओळी म्हटल्या. दुर्दैवानें याच वेळीं आमचे जांवईबापू जिना चढून वर येत होते. माझे शब्द ऐकतांच मी हें त्यांनाच उद्देशून बोलत आहे असें वाटून ते ताबडतोब खालीं उतरून परत गेले. त्यांची समजूत घालण्यास मी ताबडतोब स्वतः त्यांच्या घरीं गेलों पण त्यांनीं मला सरळ हाकलून लावलें. घरीं येऊन मी मुलीला (त्यांच्या बायकोला) त्यांच्याकडे

*या पोक्त सल्ल्यांचें नीट मनन केल्यानंतर कोणत्याच अडचणींची तुम्हांला फिकीर वाटणार नाहीं. प्रश्न कठीण; पण उत्तर अत्यंत साधें—सर्वांना पटणारें !*

पाठविलें. तिला त्यांनीं घरांत घेतलें. पण 'या पुढें तुमची मुलगी तुम्हांला मेली असं समजा' असा त्यांचा निरोप आला. या परिस्थितींत काय करावें हें सुचविल्यास आभारी होईन.

अप्पासाहेब देशपांडे यांस,

अप्पासाहेब, मी सुद्धां एकदां आंघोळ करून बाहेर गॅलरींत येऊन—

आली रे आली, आली रसाळ आंबेवाली! हें गाणें म्हणत होतों. याचवेळीं खालीं फाटकांतून एक आंबेवाली आंत शिरत होती. दुर्दैवानें (माझ्या–तिच्या नव्हे) ती 'रसाळ' होती. पुढें काय झालें, अप्पासाहेब तें मी सांगूं नये आणि तुम्हींच काय पण कुणीच तें ऐकूं नये.

तुमच्या मुलीबद्दल म्हणाल तर त्याची कांहीं काळजी करूं नका. थोड्या दिवसांनीं आपोआऽप घरीं परत येईल. तिच्यामागून जांवईबापू देखील 'अग अग म्हशी मला कां नेशी?' असें म्हणत येतील. या जांवईबापूंच्या धमक्या अशा मनावर घ्यायच्या नसतात.

४. अरुणाबाई भोंसले, नागपूर.

विठ्ठलभाऊजी, काल किनई आमच्या घरीं 'ह्यांनीं' एक उंदीर मारला. तो किनई जवळ जवळ मांजराएवढा मोठा होता. आमच्या घरांत किनई असे पुष्कळ उंदीर आहेत.

अरुणाबाई भोंसले यांस,

अरुणाबाई, आपल्या लिहिण्यावरून आपणाला कांहीं सल्ला हवा आहे कीं आपण नुसतीच बढाई मारीत आहांत तें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. त्याबद्दल जरूर तो खुलासा केल्यास बरें होईल.



विलास प्रेमवेडे यांस—

कुणाकडे रिव्हॉल्व्हर मिळाल्यास एक गोळी हृदयांत किंवा मेंदूंत (स्वतःच्या, सुरेखाच्या नव्हे) झाडावी.

५. विलास प्रेमवेडे, मुंबई,

मी एक बावीस वर्षांचा तरुण आहे. आमच्या समोरच्याच बिल्डिंगमध्यें राहणाऱ्या सुरेखा नांवाच्या एका मुलीवर माझें प्रेम बसलें आहे. ही सुरेखा खूप हुशार आहे. खूऽप सुंदर आहे, खूऽऽप श्रीमंत आहे. तिची जातसुद्धां आमच्यापेक्षां वेगळी आहे. मी तिला लग्नाबद्दल विचारलें. ती नुसते 'हुडुत' असें म्हणाली. त्यामुळें मी अगदीं निराश झालों आहे. आत्महत्या करावी असें वाटत आहे. कांहीं उपाय सुचविल्यास आभारी होईन.

विलास प्रेमवेडे यांस,

खालीलपैकीं कोणताहि एक उपाय करावा.

१) एक कप पाण्यांत एक औंस मोरचूद टाकून तो विरघळेपर्यंत तें मिश्रण ढवळावें व मग प्यावें.

२) वचनागाचें विष मिळेल तितकें खावें.

३) सायनाईड नांवाचें जालीम विष नुसतें चिमूटभर चाखावें.

४) आगगाडी वेगांत येत असतां रुळावर मान ठेऊन देवाचें (किंवा सुरेखाचें) नांव घेत स्वस्थ पडून राहावें.

५) कुणाकडे रिव्हॉल्व्हर मिळाल्यास एक गोळी हृदयांत किंवा मेंदूंत (स्वतःच्या, सुरेखाच्या नव्हे) झाडावी.

६. अल्काताई शिराळे, पुणें.

विठ्ठलभाऊजी, आमचा रेडिओ किनई गेले कांहीं दिवस बिघडला आहे. सारखा ह्यांच्या घोरण्यासारखा खर्र खर्र आवाज येतो. मधूनमधून 'फट्, खट्, कुई, कुंई' असेहि आवाज येतात.

अल्काताई शिराळे यांस,

अल्काताई, आमचा माणूस किनई बाहेर रिपेरिंग करायला गेला आहे. आल्याबरोबर ताबडतोब पाठवून देतों.

७. कोकिळा साळुंके, नाशिक.

विठ्ठलराव, माझा आवाज किनई किती किती गोड आहे. मी पुष्कळ लोकांना गाणं म्हणून दाखवलं. पण कुण्णी कुण्णी मेलं माझं कौतुक केलं नाहीं. मी फिल्म लाईनमध्यें गेले तर मला कित्तीतरी भाव येईल. मला किनई तुमचा सल्ला हवा आहे. अगदीं अर्जंट बरं का. तुमच्या फिल्म लाईनमध्यें ओळखी आहेत का? तुम्हांला कधीं एकदां भेटेन असं झालं आहे मला.



विठ्ठलराव! मी पुष्कळ लोकांना गाणं म्हणून दाखवलं. पण कुण्णी कुण्णी मेलं माझं कौतुक केलं नाहीं.
—मिस् कोकिळा साळुंके

कोकिळाबाई साळुंके यांस,

कोकिळाबाई, तुम्ही कुणा कुणा पुढें गाणं म्हटलं त्यांचीं नांवं माझ्याकडे लिहून पाठवा. आपण त्यांचीं घरं उन्हांत नाहींतर पावसांत बांधूं हं?

ही फिल्म लाईन, ही काय भानगड आहे बुवा? मला कांहींच कल्पना नाहीं.

मी परवां आफ्रिकेला जाणार आहे. सात वर्षें तिकडेंच राहणार आहे. तेव्हां तें भेटींचं सध्यां नाहीं जमायचं, बरं का. पुढें पाहूं केव्हां तरी.

८. प्रकाश सोनटक्के, बारामती.

आजकाल वर्तमानपत्रांत 'शेळीला माणसाचें तोंड असलेलें करडूं झालें.' अशा प्रकारच्या बातम्या पुष्कळदां येतात. त्या खऱ्या असतात का? खऱ्या असल्यास याचा खुलासा कसा करतां येईल? कीं याला केवळ परमेश्वरी चमत्कार असेंच म्हणावयाचें?

प्रकाश सोनटक्के यांस,

या गोष्टी खऱ्या असण्याची शक्यता फारच कमी. पण असल्यास त्याचा खुलासा असाः तुमचें वय काय आहे याची तुम्ही पत्रांत मला कांहींच कल्पना दिलेली नाहीं. पण 'तें तसलें' कांहीं तुम्हांला अजून समजत नसेल तर 'देवबाप्पानें जादू केली' असा त्याचा खुलासा करतां येईल. पण 'तें तसलें' तुम्हांला समजत असलें तर याचा खुलासा मला वाटतें करण्याची गरज नाहीं.

●●●




*सहदेव—पांडवांचा हा सर्वांत लहान भाऊ. भीम आणि अर्जुन यांना ज्या युधिष्ठिराच्या विरुद्ध बोलण्याचें सामर्थ्य झालें नाहीं त्याच युधिष्ठिराविरुद्ध सहदेवानें निर्भिडपणें घोषणा केली, कीं 'मी या युधिष्ठिराचा त्याग करीन….'*

# त्या दुर्योधनाशीं जपून बोला !

**नोग्रं दुर्योधनो वाच्यः ॥ ३१ ॥**

**त्या दुर्योधनाशीं जपून बोल**

द्रौपदीच्या अपमानाचा बदला घेण्याच्या उद्योगांत कृष्णापुढें उभें राहिलेलें सर्वांत मोठें संकट म्हणजे अविरत शांतिपाठाचा परिणाम होऊन भीमानें हातपाय गाळणें हें होय. जो भीम द्रौपदीची विटंबना होतांच युधिष्ठिराचे हात जाळावयास निघाला, ज्यानें द्रौपदीच्या अब्रूसाठीं कीचकासारख्या मल्लाचा लगदा केला, ज्यानें पुढें एकट्यानें शंभर कौरव जीवें मारले, जो दुःशासनाचें रक्त अक्षरशः प्याला, [ या गोष्टीची शंका घ्यावयास नको. बेफाट सामर्थ्य असणाऱ्या व्यक्तीचा क्रोध, अनैसर्गिक दडपणाखालीं प्रदीर्घ कालपर्यंत धुमसत ठेवला गेला तर त्याची प्रतिक्रिया म्हणून असा विस्फोट होणें अशक्य नाहीं. यांत दोष असलाच तर तो या कोपाचा मार्ग अडविणाऱ्या युधिष्ठिराचा आहे. आपल्या कृष्णाजीची अथ कृष्णाच्या माणसाचें रक्त पिणें सर्वथैव अशक्य असतें तर नरडीचा घोट घेणें असा शब्दप्रयोग भाषेंत येता ना. ] जो दुर्योधनाच्या शिरावर थैथया नाचला, त्या भीमावरही शांतीच्या अविरत उपदेशाचा विपरीत परिणाम झाला हें खरोखरच घोर संकट होतें.

शिवाय या संकटाच्या काळीं, भीमानें कळत वा नकळत पण कृष्णाची नाडी बरोबर ओळखून तीवर बोट ठेविलें होतें. कृष्ण समेटास जाणार होता खरा. पण समेटाचें बोलणें करतां करतांच दुर्योधनाला ठोकरून तो समेटाचा धुव्वा उडविणार होता. पण ही कृष्णाच्या मनांतील योजना होती. या योजनेचा अर्जुनास पत्ता नव्हता. द्रौपदीसही नव्हता. धर्मास तर नव्हताच नव्हता. अशा प्रसंगीं भीमानें न कळतां कृष्णाच्या नाडीवर बरोबर बोट ठेविलें. तो म्हणाला,

—'कृष्णा तू अशाच प्रकारें बोल कीं समेट सफल होईल. दुर्योधन असहनशील, क्रोधी आणि महामना माणूस आहे. त्याच्याशीं उग्र शब्दांत बोलूं नकोस; ( नोग्रं दुर्योधनो वाच्यः ) तर समजुतीनें बोल. तुझा प्रत्येक शब्द, कोमलपणें, मृदुपणें, सावकाशपणें त्याला रुचेल असा बोलला जाऊं द्या. आम्ही सारे हवे तर हात जोडून दुर्योधनाच्या मागून पायीं चालूं. पण ( इतके लोक म्हणतात त्या प्रमाणें ) आपल्यामुळें या पवित्र वंशाचा निर्वंश व्हावयास नको. तूं त्यांच्यावर कसल्याही अन्यायाचा आरोप करूं नको. आमचें काहीं वांकडें झालेंच नाहीं, आम्हीं उदासीन आहोंत, वैरी नसून तटस्थ आहोंत असेंच तूं त्यांना भासव.'

भीमाचें हें भाषण ऐकून कृष्णास वाटलें कीं हिमालय पर्वत मोहरीएवढा लहान झाला. आगीचें पाणी झालें. पण कृष्ण संकटांना डरणारा नव्हता. कसल्याही संकटांतून सुटण्याचा मार्ग त्याला माहित होता. भीमाची ही अवस्था पाहून त्याला डिवचण्यासाठीं कृष्ण हंसून म्हणाला,

—वा ! भीमा, शाबास ! आजवर तूं कौरवांस चेंगरण्याच्या इच्छेनें युद्धाच्या गर्जना करीत होतास. तुला या विचारानें रात्रीं झोंप येत नव्हती. झोंप लागलीच तर तूं स्वप्नांत दुःशासनाचें रक्त पिण्याच्या घोर गर्जना करीत होतास. क्षणोक्षणीं दीर्घ श्वास सोडून तूं क्रोधानें जळत होतास. राखेंतल्या निखाऱ्याप्रमाणें तूं सदा अशांतीनें धगधगत होतास. सदा एकांतांत बसून लोकांनीं वेडा म्हणावें अशा तऱ्हेनें तूं उग्र श्वास घेत होतास. पाळांमुळांसह उखडून काढलेल्या वृक्षांचा चेंदामेंदा करावा म्हणून हत्ती टाकतो तशी पावलें तूं टाकीत होतास. तूं मधेंच आपल्याशीं गर्जना करीत वेड्याप्रमाणें इकडून तिकडे भटकत होतास. तुला कधीं

अनुक्रमणिका

आनंदाचा स्पर्श होत नसे की तूं कधीं कुणाचे अभिनंदन करीत नसेस. कधीं तूं अकस्मात हंसावयाचास तर कधीं एकांतांत रडावयाचास. कधीं गुडघ्यांत मस्तक घालून बसावयाचास तर कधीं भुवया उंचावून ओंठ चावावयाचास. जो तूं त्यावेळीं क्षणोक्षणीं दुर्योधनाची मांडी फोडण्याची प्रतिज्ञा करावयाचास तो तूं आतां हात जोडून दुर्योधनाच्या मागें उभा रहावयास तयार झाला आहेस ना ? वा !

—पराक्रमाची बढाई मारणारे लोक प्रसंग येतांच लटपटून विपरीत वागूं लागतात.. तुलाही आतां युद्धाचें भय वाटत आहे–तुला भयानें वेड लागलेलें आहे. तूं त्यामुळें पुरुषार्थहीन नपुसकाप्रमाणें बोलत आहेस. तुझें हृदय भीतीनें कांपत आहे; मन शिथील झालें आहे; जांघा आखडल्या आहेत आणि म्हणून तुला समेट सुचत आहे. मनुष्याचें चित्त सदा चल असतें हेंच खरें. मनुष्यवाणीनें एकादा बैल बोलावा तशी तुझी ही विपरीत वाणी आहे. तू असें बोलावें याचें मला आश्चर्य वाटत आहे. तुझा ही अवदशा पाहून पांडवांचा थरकांप झाला आहे. अरे तुला कांहीं लाज ? ऊठ. आपल्या पूर्वकर्मांचा विचार कर. आपल्या कुलाचा विचार कर. तुझी ही ग्लानी क्षत्रियोचित नाहीं. क्षत्रियांनीं पराक्रमानें यश संपादन करावयाचें असतें, भीक मागून नव्हे.

हे शब्द ऐकून चाबकानें हाणलेला जातिवंत घोडा सपकन सावध व्हावा तसा भीम खडबडून जागा झाला. तो म्हणाला,

—कृष्णा मी एक बोलत आहे आणि तूं एक समजत आहेस. माझी युद्धप्रीति आणि पराक्रम मिथ्या नाहीं हें तूं जाणतोस. किंवा कुणी सांगावें ? जाणीत नसशीलही. अथांग सरोवरांत डुंबणाऱ्या माणसाला त्याच्या खोलीचा पत्ता नसावा त्याप्रमाणें माझा स्नेही असूनही तुला माझ्या मनाचा थांग लागलेला नाहीं हेंच खरें. म्हणून तूं हा अनुचित आक्षेप मजवर घेत आहेस. जें अयोग्य वचन माझ्याबद्दल शत्रूही बोलणार नाहींत तें तूं बोलत आहेस. हिमालय पर्वत माझ्या पकडीत आला तर कृष्णा, मी तो चूर्ण करीन. कल्पांतकालीं टक्कर घेणाऱ्या ग्रहगोलांना मी सावरीन. असें माझें सामर्थ्य आहे. पिकलेल्या व्रणामधें सुरी खुपसावी तसे हे कठोर शब्द तूं मला कां ऐकवीत आहेस ? तूं आतां युद्धाचा प्रसंग लढवून आण. माझ्या कौरवांना मी पायातळीं चेचून टाकीन. माझी मज्जा शिथिल झाली, भयानें जांघा आखडल्या म्हणून मी हें बोललों असें नव्हे. तर केवळ दया बुद्धीनें बोललों. मी कष्ट सोसल्यानें दुसऱ्याची विपत्ती टळणार असली तर टळो अशा सौहार्दानें बोललों. नपूसक म्हणून नव्हे.

कृष्णाचें काम झालें होतें. संकट टळलें होतें. भीमाचें दुखावलेलें मन शांत करणें जरूर होतें. कृष्ण उत्तम सारथी होता. चाबूक केव्हां मारावा आणि खरारा केव्हां करावा हें तो जाणत होता. तो म्हणाला,

भीमा मी केवळ तुजविषयींच्या प्रेमानेंच हें बोललों. तुझ्यावर आरोप करण्यासाठीं, पांडित्य दाखविण्यासाठीं, रागानें अथवा व्याख्यानाची हौस म्हणून बोललों नाहीं. तुझ्या मनाचा थांग मला पुरेपूर आहे. तुझें बल आणि पराक्रम माझ्याइतकें कोण जाणतो ? मी तुझा तिरस्कार कसा करीन ? भीमा, तूं स्वतः तुझ्याठायीं जे जे कल्याणकारी गूण आहेत असें मानतोस, त्याहून सहस्र पटींनीं अधिक गूण तुझ्याठायीं आहेत हें मी जाणतों. तूं त्रिभुवनाकडून सन्मान आणि प्रतिष्ठा मिळण्यास पात्र आहेस.

—भीमा पुरुषार्थाशिवाय कोणत्याहि साधनानें जीवननिर्वाह होत नाहीं. म्हणून आपण पुरुषार्थानें कर्मास प्रवृत्त व्हावयास हवें. प्रारब्ध हें अज्ञात असतें. त्यामुळें पुरुषार्थास फल मिळेलच अशी खात्री नसते. पण पुरुषार्थावाचून नुसत्या प्रारब्धानें कांहींहि मिळणार नाहीं हें निश्चित होय. पर्जन्य प्रारब्धानें पडतो. पण शेत नांगरण्याचा पुरुषार्थ करील त्याचेंच शेत त्या प्रारब्धानें पिकतें. संतती प्रारब्धानें होत असली तरी कांतासमागम करणाऱ्यालाच ती होते. तेव्हां पुरुषार्थ हा केलाच पाहिजे. युद्ध होईल त्यांत आपणास अवश्य जय मिळेल असें मी सांगूं शकत नाहीं. परंतु तेज आणि उत्साह यांचा त्याग आपण कधींहि करतां कामा नये. विषाद आणि ग्लानी यांना कधींहि मनात थारा देता कामा नये. हें मात्र मी तुला निश्चयानें सांगतों.

—उठ. रागावूं नकोस. मी बोललों तें तुझ्या भल्याकरता असेंच तूं समज. तुझ्या यशाची तळमळ आहे म्हणूनच तुझी कावरता बघून मी तुला कटुशब्द बोललों. भीमा, प्रेमाशिवाय उगाच कोणाला कोणी बोलेल काय ?

आत्माराम नीलकंठ

## कस्मात् माम् अभिशंकसे ? : ३२ :

## अर्जुना, तूं माझीही शंका घेतोस ?

ज्या कुठल्या एकाच गोष्टीमुळें पांडवांचा भारतीय युद्धांत विजय झाला, एवढेंच नव्हे तर पांडव चिरंजीव झाले ती गोष्ट म्हणजे कृष्णाचा पांडवांशीं असलेला स्नेह होय. हा स्नेह खरोखर अकृत्रिम होता. या स्नेहापायीं कृष्णानें राजसूय यज्ञांत उष्टीं काढलीं, भारतीय युद्धांत घोडे धुतले. आपल्या स्नेहमय मैत्रीची अशी जोड त्यानें पांडवास दिली एवढेंच नव्हे तर आपल्या असामान्य राजकारणी कर्तृत्वाचीही जोड त्यांना देऊन, त्याना जीवनातून पार पाडलें.

कृष्णाचें हें मार्गदर्शन पांडवांस लाभलें तें कुंतीच्या नात्यामुळें नव्हे; युधिष्ठिराच्या धार्मिकतेमुळें नव्हे; कीं पांडवांवरील संकटामुळेंही नव्हें. नात्याचाच प्रश्न घेतला तर पांडवाप्रमाणेंच कृष्णाचा आतेभाऊ असलेला शिशुपाल. त्याच्याशीं कृष्णाचें कितपत सरळ होतें हें आपण जाणतोंच. युधिष्ठिराची धार्मिकता हीही कृष्णाच्या पिंडाशीं जुळणारी नव्हती. संकटाचा विचार केला तर पांडवाच्या जीवनात द्रौपदीचा प्रवेश होईपर्यंत जी दुसरीं अनेक लाक्षागृहादी संकटें आलीं त्या प्रसंगीं कृष्णानें पांडवाची मुळींच काळजी केलेली नव्हती.

कृष्णाचा पांडवांच्या जीवनांत प्रवेश हा द्रौपदीच्या स्वयंवरापासूनच झाला हें सत्य आपण मान्य करावयास हवें. कृष्ण स्वयंवरास हजर होता. स्वयंवराचा पण कृष्णास झेपेसा असता तर तो स्वयंवरांत भाग घेताही. पण हा पण धनुर्विद्येच्या कसोटीचा असल्यानें तो त्यापासून अलिप्त राहिला. द्रौपदीच्या लोकविलक्षण सौंदर्याची जी भूल सभेतील प्रत्येक पुरुषमात्रावर पडली होती तिला कृष्ण अपवाद असण्याचें कांहींही कारण नव्हतें. अर्जुनानें द्रौपदी जिंकिली त्याच दिवशीं कृष्णानें कुंतीची भेट घेऊन आपल्या नात्याची उजळणी केली आणि पांडवांच्या जीवनांत प्रवेश केला. तो आमरण टिकविला. द्रौपदीचें कृष्णावर दुर्दम्य आणि अनिवार असें आकर्षण पडलें आणि तें शुक्लपक्षीय चंद्रकलेप्रमाणें प्रतिदिनीं वाढत गेलें. अर्थात कृष्ण आणि द्रौपदी या दोन्ही








व्यक्ति असाधारण अशा दिव्य गुणांनीं युक्त असल्यामुळें त्यांतील स्त्री-पुरुष आकर्षणाचें उदात्तीभवन अपाप अशा स्नेहांत झालें. हा स्नेह हाच पांडवांची शक्ति ठरला. अर्थात पर्यायानें द्रौपदी हीच पांडवांची, कृष्णाची किंवा महाभारताची शक्ति होय.

कृष्णानें आपली बहीण सुभद्रा जरी अर्जुनास दिली असली तरी कृष्णार्जुन स्नेहाचें कारण म्हणून तिचा विचार न करणें बरें. एकतर तिची पात्रता द्रौपदीच्या पासंगासही न पुरावी अशी थिटी होती. सुभद्रा नुसती अभिमन्युमाता ठरली तर द्रौपदी जगन्माता झाली ती आपल्या दिव्य सामर्थ्यानेंच होय. 'शयनेषु रंभा' ही भूमिका पार पाडण्याचें सुभद्रेचें स्त्रीत्व कितीही विलोभनीय असलें तरी सहधर्मचारिणी या कल्पनेची जी मर्यादा द्रौपदीनें गांठली ती सुभद्रेस कल्पितांही येऊं नये इतकी उत्तुंग ठरली. वनवासाचा प्रसंग आला तेव्हां सुभद्रा मुलाला कडेस मारून तडक माहेरीं निघून गेली. उलट द्रौपदीनें माहेरच्या सुखाचीं सारीं प्रलोभनें झिडकारून वनवासाचें अग्निदिव्य आलिंगिलें. 'गृहिणी सचिवः सखी मिथः' इत्यादी व्याख्येप्रमाणें द्रौपदीनें भूषविलेली भूमिका अनन्यसाधारण होय. तिच्या सौंदर्याबरोबरच, तिच्या त्यागशीलतेबरोबरच तिची बुद्धीही इतकी प्रखर आणि मूलगामी होती की साऱ्या पांडवांची बुद्धि एक करूनही ती तिच्यापुढें उणी पडती. तिच्या बुद्धिला तोडीस तोड म्हणजे एक कृष्णाची बुद्धी. सुभद्रा नुसती बहीण असली तरी द्रौपदी आपल्या दिव्य व्यक्तित्वाच्या सोज्वल आकर्षणानें कृष्णाची लाडकी मैत्रिण झाली. रक्ताच्या नात्यापेक्षांही भावनेचें नातें अधिक दृढ असतें. चिंधीचें गाणें लिहिणाऱ्या प्रतिभावान कल्पनेनें हें आधींच मान्य केलें आहे. सुभद्रा ही कृष्णार्जुन स्नेहाचें कारण नव्हती तर कार्य होती. द्रौपदी हीच या स्नेहाचें मूळ कारण द्रौपदीचा आधार कृष्ण व कृष्णाचा आधार द्रौपदी. पांडवांचें साचिव्य कृष्णानें जेवढें केलें आणि जीवन घडविलें त्याहून अधिक त्यांचे साचिव्य द्रौपदीनें केलें आणि जीवन घडविलें. वनवासांत पांडवांची ईर्षा जिवंत ठेवण्याचें अवघड काम द्रौपदीनेंच केलें आहे. किंबहुना कृष्ण हा द्रौपदीच्या मनाचा कल ओळखून तिच्या सुखासाठींच पांडवांचें साचिव्य करता झाला आहे. अर्थात कृष्ण हा पांडवांचा आणि अर्जुनाचा स्नेही बनण्याची एकमेव प्रेरणा द्रौपदीचें दिव्य आकर्षण हेंच होय.

कृष्णार्जुनाचें साहचर्य जुळलें तें आमरण टिकलें. परंतु कितीही उत्तम स्नेह असला तरी इतक्या प्रदीर्घ कालांत एकमेकांचीं मनें एकमेकांस न कळावीं असें कांहीं प्रसंग येणें साहजिक आहे. असा एक प्रसंग भारतीय युद्धाच्या आरंभीं आला. या प्रसंगाच्या जरा आधींच, कृष्ण—सत्यभामा आणि अर्जुन—द्रौपदी या जोडप्यांमध्यें मानसिक एकात्मतेची आपपर विरहिततेची जी पवित्र पराकोटी झालेली होती तिचें वर्णन महाभारतांत आहे. संजय जेव्हां धृतराष्ट्राचा निरोप घेऊन अर्जुनाच्या अंतःपुरांत जातो तेव्हां त्याला कृष्णार्जुनाचें जें दर्शन होतें त्याचें वर्णन तो उद्योग ५९।७ मधें पुढीलप्रमाणें करतो. श्रीकृष्णाचे दोन्ही चरण अर्जुनानें आपल्या मांडीवर घेतले होते. अर्जुनाचा एक पाय द्रौपदीच्या मांडीवर होता आणि एक सत्यभामेच्या मांडीवर होता. कृष्णार्जुन आणि द्रौपदी-सत्यभामा यांच्या स्नेहाची एकमनस्कता देहभेद आणि लिंगभेद यांच्या पार गेलेली होती याचा हा उत्तम पुरावा आहे.

संजयाच्या उपरोक्त भेटीनंतर कांहीं दिवसांनीं, दुर्योधनाशीं समेट करावयास म्हणून कृष्ण निघाला. परंतु कृष्ण समेटास अनुकूल नाहीं हेंही प्रकट झालें. युधिष्ठिर आणि कृष्ण





यांच्या मतांत असलेल्या विरोधाची कल्पना येतांच अर्जुनाचा गोंधळ उडून त्याला धड मार्ग सुचेना. वस्तुतः त्या दोघांचा स्नेह इतका दाट होता कीं, अर्जुनास कृष्णाचें मन कळावयासच हवें होतें. पण तें त्याला मुळींच कळलें नाहीं. त्यावेळीं अर्जुन जें बोलला तें असंबद्ध भाषणाचा एक उत्तम नमुना आहे.तो म्हणाला,

—कृष्णा मला काय बोलावयाचें तें युधिष्ठिर बोललाच आहे. पण तुझ्या बोलण्यावरून असें दिसतें कीं, समेटाचें कार्य तुला सरळ दिसत नाहीं किंवा प्रयत्नापेक्षां तूं दैवालाच अधिक महत्व देत असावास. कोणतीही गोष्ट तूं असाध्य मानतां कामा नये. प्रयत्नानें सर्व गोष्टी साध्य झाल्याच पाहिजेत. तूं असाच प्रयत्न कर कीं ज्यामुळें आमचा शत्रूंशीं समेट घडून येईल. कृष्णा, कौरवांच्या बरोबर आमचा संधी घडो किंवा तुझी इच्छाच दिसत आहे तसें युद्ध घडो. तूं करशील ते भल्याकरतां असें विचारांती मानावयास हवें. तुला समेट उचित दिसत नाहीं हेही बरोबरच आहे. तेव्हां जें काय करावेंसें वाटेल तें तूं कर.

हें द्विधा भाषण अर्जुनानें केलें, त्याला त्याचें गुरुप्रामाण्य कारण होतें. कृष्णावर त्याचा विश्वास होता त्यापेक्षां अधिक त्याची गुरुप्रामाण्यावर श्रद्धा होती. युधिष्ठिराच्या वचनाबाहेर वागण्याची कल्पनाहि त्याला असह्य होती. द्यूत प्रसंगीहि भीम युधिष्ठिरावर भडकला होता तेव्हां अर्जुन शांतच होता. त्यानें भीमालाच उलट आवरलें होतें. आतां युधिष्ठिर आणि कृष्ण यांचा विरोध प्रकट होतांच तो गोंधळला. द्रौपदीप्रमाणें युधिष्ठिरास गुंडाळून ठेवण्याचें सामर्थ्य त्याला अजून आलें नव्हतें. पुढें कर्णवधाच्या वेळीं हें सामर्थ्य त्याला आलें तेव्हांही त्याला पश्चाताप झालाच. आतांही त्याची अवस्था दयनीय झाली.

त्याची ही अवस्था पाहून कृष्णास वाईट वाटलें.युधिष्ठिराचा आणि आपला विरोध असतां आपणास निःशंकपणें अनुसरण्याचें धैर्य अर्जुनास नाहीं याचा कृष्णास खेद वाटला. आपलें इतकें एकमन असतां अर्जुनास प्रकाश दिसूं नये; मार्ग कोणता हें नीट कळूं नये; हें त्यास रुचलें नाहीं. तो म्हणाला,

—अर्जुना, शांती आणि युद्ध यांतून निवड करणें माझ्यावर आलें आहे. मी प्रयत्न करीन त्यांत दैवाचें तुम्हांस साह्य हवें. प्रयत्न आणि दैव हे परस्पर निरपेक्ष नाहींत. दुर्योधनाच्या वधाशिवाय मला स्वतःला मार्ग दिसत नाहीं. युधिष्ठिरानें केलेली पांच गावांची नम्र मागणी दुर्योधनाकडे बोलण्यांत अर्थ नाहीं आणि ती मी बोलणारही नाहीं. माझ्या मतें दुर्योधन वध्य आहे. मी आजवर तुमच्या कल्याणासाठीं झटलों. प्रत्येक अडचणींत तुम्हांला हात दिला. मला अनुसरल्यानें तुमचें नेहमीं कल्याणच झालें. असें असतां युधिष्ठिर आणि मी यांत मतभेद झाल्यावर तुमच्या कल्याणासाठीं कोणास निःशंक अनुसरावें हें तुला कसें कळत नाहीं ? मी समेटाच्या प्रयत्नांत कसूर करीन अशी शंका तूं घेत आहेस. खरें म्हणजे मला समेट नको असेल तर तीच गोष्ट तुझ्या कल्याणाची हें तूं जाणावयास हवें. असें असतां मी योजिलेला मार्ग तुम्हांला कल्याणप्रद होणार नाहीं अशी अडाणी शंका तूं माझ्याबद्दल काय म्हणून घेत आहेस? (कस्मात् माम् अभिशंकसे ? )

कृष्णाच्या या स्पष्ट बोलण्यानें अर्जुनाच्या शंका फिटल्या. पण त्यावरून एक गोष्ट स्पष्ट झाली. अर्जुनाचें युधिष्ठिरप्रामाण्य इतकें प्रबळ होतें कीं कृष्णाचा त्याच्याशीं विरोध झाला तेव्हां त्याला युधिष्ठिराचा मार्ग चुकत आहे अशी शंका आली नाहीं तर कृष्णाचा मार्ग चुकत आहे अशी शंका आली.

## तदहं धर्ममुत्सृज्य ।। ३३
## मी या युधिष्ठिराचा त्याग करीन

राजा आणि काल यांतून कोण कोणास घडवितो या प्रश्नाचें ठाम उत्तर महाभारतानें राजा कालास घडवितो असें दिलें आहे. पण हें विशिष्ट मर्यादेपर्यंतच खरें आहे. राजानें काल घडविला कीं त्या कालांतून पुन्हां राजेही घडत असतात. कालाच्या गतीबरोबर प्रसंगांची गुंतवणूक एकदां उलगडूं लागली कीं तिच्यांत सांपडणाऱ्या अनेक व्यक्तींवर प्रकाश पडून त्यांचीही पारख लागते व त्यांचें जीवन घडलें जातें.

प्रत्यक्ष श्रीकृष्णाचें जीवन हें महाभारतानें घडविलें आहे. महाभारत न घडतें तर कृष्णाची महत्ता न प्रकटती. कृष्णाच्या जीवनकार्याचे तीन ठोकळ भाग पडतात. महाभारता बाहेरील कृष्णाचें, कालिया वध, रासक्रीडा इत्यादी जीवन; महाभारतांतील गीता आणि महाभारतांतील द्रौपदीचा सखा म्हणून त्यानें केलेलें राजकारण. यांतील पहिलें चरित्र हें कवडीमोल आहे. मोठेपणा पावल्यावर त्याला देवावतार बनविण्यासाठीं त्याचें बाल्य अद्भुतांत घोळून रचलेल्या भाकडकथा याहून त्या चरित्राला मोल नाहीं. भगवद्गीतेची रचना कृष्णाच्या नांवावर मोडत असली तरी ती त्याची नसावी असें मला वाटतें. कृष्णार्जुनाचें लढाईच्या मैदानावर जर कांहीं संभाषण झालें असेल तर तें कृष्ण या अर्जुन हेंच पुनरुद्धृत करूं शकतात. तिथें तिसरा कोणी नसल्यानें तें इतरास ज्ञात होणार नाहीं. संजयास दिव्य दृष्टी होती व तो सारें संभाषण ऐकून लगेच धृतराष्ट्रास सांगत होता हा इतिहास नसून अद्भुत आहे. संजय हा धृतराष्ट्राकडे नसून रणांगणावर लढत होता असा महाभारतांत स्पष्ट पुरावा आहे. कृष्ण आणि अर्जुन यांचें जें संभाषण झालें त्याची उजळणी कृष्णानें करावी अशी विनंति अर्जुनानें पुन्हां कृष्णाला केली असता 'त्यावेळीं मी काय बोललों तें बोललों. तें आतां मला आठवणार नाहीं' असें उत्तर कृष्ण देतो. यावरून हें संभाषण जसें घडलें तसें दोघांच्याहि स्मरणांत नव्हतें. इतकेंच नव्हे तर संजय अथवा धृतराष्ट्र या कोणाकडून स्मृतिबद्ध अथवा लेखबद्ध झालें नव्हतें हें उघड आहे. शिवाय कृष्ण हा मुद्देसूद बोलणारा मनुष्य आहे. वायफळ तत्वचर्चा करण्यामध्यें त्याला रस नाहीं. ज्यातून कर्मपर, संन्यासपर, ज्ञानपर आणखीही नाना गोष्टींपर असे वितंडवाद निघतील, ज्या संभाषणाचा सुसंगतपणा सिद्ध करण्यासाठीं विद्वानांना आटापीट करावी लागेल असें कृष्ण बोलणार नाहीं. शिळोप्याच्या वेळींही तो असें बोलणार नाहीं. मग लढाईच्या हातघाईत कुठून बोलणार ? अर्जुन गलितगात्र झाला आणि कृष्णानें त्याला चेव आणला हें शक्य आहे. पण त्यावेळीं जें बोलणें झालें तें असेंच नसावें. या बोलण्यांत द्रौपदीचें नांवही नाहीं आणि प्रसंगां त्यानें चेव येण्याऐवजीं नव्या शंका येतात हें विपरीत आहे. कृष्णाचें आणि अर्जुनाचें कांहीं बोलणें झालें हा प्रसंग आणि कृष्णाचा मोठेपणा याचा फायदा घेऊन, जें तत्वज्ञान लोकांच्या गळीं उतरणें कल्याणप्रद वाटलें, ते इथे कोणीतरी कदाचित व्यासांनी कृष्णाच्या मुखांत घातलें आहे असें मी मानतो. यामुळें गीतेची किंमत मुळींच कमी होत नाहीं. गीतेची किंमत ही ती कृष्णानें सांगितली यावर अवलंबून नसून तिच्यांत जें कांहीं तत्त्वज्ञान आहे त्याच्या मौलिकतेवर अवलंबून आहे. ही मौलिकता गीता कुणीहि सांगितली तरी कमी अधिक

अनुक्रमणिका

## ती माझी बायको होती !

युद्धकाळांतील जर्मनींतील गोष्ट. एक खलंपट मेजर मोटारींतून चालला होता. इतक्यांत रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला चाललेली एक सुंदर युवती त्याच्या दृष्टीस पडली. 'गाडी त्या रस्त्यावर वळव' तो ड्रायव्हरला म्हणाला. शक्य त्या वेगांत ड्रायव्हर गाडी वळवूं शकला नाहीं. त्याला थोडा उशीर झाला होता. त्या अवधींत ती सुंदरी दृष्टीआड झाली होती.

'आणीबाणीच्या वेळीं तूं ड्रायव्हर म्हणून अगदीं कुचकामी आहेस.' मेजर त्याच्यावर गुरगुरला.

'साहेब दोस्त-राष्ट्रांतली होती ती–' ड्रायव्हर हळूंच उत्तरला.

'चूप !' मेजर चरफडला. तो ड्रायव्हर उत्तरला, 'साहेब आणीबाणीची वेळ मी जाणतों. ती माझी बायको होती !' ड्रायव्हरचें हें उत्तर ऐकून मेजरनें अस्वस्थपणें चिरूट पेटविला. ●●

होणार नाहीं. शिवाय गीतेंतील एकही शब्द कृष्णाचा नाहीं असें नव्हे.

महाभारतांतील राजकारण हा कृष्ण चरित्राचा तिसरा आणि माझ्या मतें एकमेव भाग होय. कृष्णाचे श्रेष्ठ गुण या राजकारणांत कसास लागले आणि दिव्यांतून पार पडले. त्यामुळें त्याला महत्ता प्राप्त झाली. दुर्योधनानें महाभारत रूपानें जो काल घडविला त्या कालानें कृष्णास घडविलें. पुन्हां कृष्णानें त्याच कालावरून आरूढ होऊन त्याला वळण लावलें. त्यामुळें काल आणि राजा यांतून एकच दुसऱ्याला घडवितो असें म्हणण्यांत मर्यादित सत्य आहे. आपल्या आपल्या सामर्थ्यानें उभयतां एकमेकांना घडवितात असें मानणें अधिक खरें.

महाभारताच्या कालांत जी नररत्नांची मालिकाच मालिका प्रकाशांत आली तिच्यांतील कौस्तुभमणी श्रीकृष्ण होय. पण या मालेंत इतरही लहानमोठे मणी होते. असा एक छोटा मणी म्हणजे सहदेव होय.

बिचारा पांडवांचा धाकटा भाऊ. धाकट्या भावाचें एकत्र कुटुंबांतील जीवन काय वर्णावें ? मातेचें वात्सल्यहि सारें मोटीं भावंडें पहिल्या भरांत खावून बसलेली असतात. मोठ्या भावास लहान होणारे कपडे वापरणें हें धाकट्या भावाचें जीवन असें म्हणतात तें यथार्थ आहे. सहदेवास यांत भरीस भर म्हणून पत्नीसुद्धां पहिल्या भरांत इतर भावांची सेवा करून आलेली लाभली होती. परंतु अशाही जीवनांतून सहदेवानं महाभारताचा एक कोपरा आपल्या तेजानें उजळून टाकला आहे. सहदेवाचें हें तेज युधिष्ठिरास असह्य आलें हें स्पष्ट होय.

सहदेव मृत्यू पावल्यावर 'हा आपणास शहाणा समजत होता. त्या पापानें मेला' असे जे निर्घृण उद्गार युधिष्ठिर काढतो त्याला कारण सहदेवानें दाखविलेलें हेंच तेज असणार.

सहदेवानें भारतीय युद्धांत आपला वाटा उचलून पराक्रम गाजविला. राजसूय यज्ञामध्यें शिशुपालानें कृष्णास विरोध केला तेव्हां शिशुपालच त्याच्या मस्तकावर पाय देण्यास उठला होता. इथें प्रसंग सांगावयाचा तो याहून फारच छोटा पण अर्थानें फार मोठा आहे.

युधिष्ठिराला आधींच युद्धाचा उत्साह फार ! जो असतो तोही 'शांती राखा. शांती राखा' या उपदेशाच्या सागरांत पार बुडालेला असतो. युधिष्ठिर तरण्याची आशाच नसते. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं ज्यांना सामर्थ्य असतें, ज्यांनीं प्रतिज्ञा केलेल्या असतात, आणि बलसंचय केलेला असतो ते भीमार्जुनही मरगळून गारठत असतात. ही कोंडी असह्य



झालेली असते आणि ती फोडणें जरूर असतें. सहदेव त्यावेळीं आपल्या तेजाच्या स्फुलिंगानें ही कोंडी फोडतो–तो म्हणतो,

—कृष्णा, युधिष्ठिरानें तुला जें कांहीं सांगितलें तें सनातन धर्माला धरून असेल. पण माझें तुला असें सांगणें आहे कीं युद्ध हें व्हावयासच हवें. कौरव स्वतः म्हणून सामेट करावयास आले तरीही त्यांना ठोकरून त्याच्याशीं युद्धच व्हावयास हवें. कौरवांनीं द्रौपदीची जी दुर्दशा केलेली आहे तीमुळें मला आलेला क्रोध कौरवांच्या वधाशिवाय मुळींच शांत होणार नाहीं. आज असें लक्षण दिसत आहे कीं भीम आणि अर्जुन हेही हातपाय गाळून युधिष्ठिराच्या नादानें शांतिपाठ गात आहेत. तर अशा प्रसंगी या युधिष्ठिराचा आणि सनातन धर्माचा त्याग करून द्रौपदीसाठीं एकटाच कौरवांशीं लढण्यास सिद्ध आहे.

धन्य हा सहदेव. भीम आणि अर्जुन यांना ज्या युधिष्ठिराच्या विरुद्ध बोलण्याचें सामर्थ्य झालें नाहीं त्या युधिष्ठिराविरुद्ध सहदेवानें घोषणा केली. धरणाचा एक चिरा निखळला कीं धरण कोसळणें सोपें होतें. युधिष्ठिराच्या दादागिरीची अभेद्य कोंडी सहदेवानें मोठ्या सामर्थ्यानें खिळखिळी केली. पूर्वी द्यूतप्रसंगीं जेव्हां भीम युधिष्ठिराचे हात जाळावयास निघाला तेव्हां त्यानें सहदेवासच अग्नी आणावयास सांगितलें ते उगाच नव्हे. तें केवळ तो सर्वांत धाकटा भाऊ म्हणून नव्हे. तर पांचही भावांत तो आपणास अधिक समानधर्मी आहे ही जाणीव त्याला होती म्हणून. युधिष्ठिराचे हात जाळावयाचा उद्योग पार पडता तर त्यांत सहदेव नक्कीच सहकार देता. पत्नीच्या शीलाचा मान राखण्यासाठीं, त्या शीलाची चाड नसणारा धर्म आणि जातगोत यांस ठोकरण्याचें सामर्थ्य आजतरी किती लोकांस होऊं शकेल ? धर्माचीं बंधनें दृढ असतां सहदेवानें कसलाही घोळ न घालतां हें सामर्थ्य दाखविलें. एकट्या युधिष्ठिरासच नव्हे तर भीम आणि अर्जुन यांस झिडकारण्यास तो डरला नाहीं. याचें मूल्यमापन कोणी कांहीं करो ! पण पत्नीच्या दृष्टीनें हाच खरा पुरुष ! आपल्या मुक्त केसांआड त्याला लपवून आपल्या हृदयाशीं धरावें असें त्या भरल्या सभेंतही द्रौपदीस वाटलें नसेल काय ?

—क्रमशः

●●●






पान ६ वरून

जग्गा न घेतां व्हरांड्याच्या पायऱ्यांवर बसून ती समोरचें अफाट माळरान उदासीनपणें निरखित राहिली. समोर तिची नजर फिरत होती. पण ती कांहींसुद्धां पहात नव्हती. तिला वेड लावणारा तो सुगंध कुठं होता ? त्याची आठवण सुद्धां काढायची तिला भीति वाटली. पुन्हां आपण वेड्या होऊं, पुन्हां आपल्या पायांत वेग संचरेल, पुन्हां आपण डोंगरावरून धांवत सुटूं–तें सारं पुन्हां घडण्याची तिला भयंकर भीति वाटली. त्या उत्कट वेडानंतर आलेली ही उत्कट निराशा तिला कांहीं केल्या सहन होईना. ती गप्प, दुर्मुखलेली बसून होती. आणि तिचा नवरा पुस्तक वाचीत आराम खुर्चीवर पडला होता. नवऱ्याकडे लक्ष जातांच ती भानावर आली. चटकन् उठून ती नवऱ्याकडे आली. तो वाचीत असलेल्या पुस्तकांत तिनं डोकावून पाहिलं. त्या प्रकरणाचं नांव होतं–गीतेमधील साक्षात्काराचें तत्त्वज्ञान.

तिला एकाएकी हंसूं आलं. साक्षात्कार आपल्याला झाला आणि आपला नवरा त्याचं तत्वज्ञान वाचीत बसलाय ! तिनं सहज एक ओळ वाचली, 'कुठचाही आध्यात्मिक अनुभव हा भव्योदात्त स्वरूपाचाच असतो आणि ह्या अनुभवानंतर जगांत एक नवीनच वैभव, एक नवचैतन्य भरून राहिलेलें आढळून येतें,' तें वाक्य वाचतांच ती चकित झाली. आपल्या नवऱ्याकडे तिनं एकवार टक लावून पाहिलं. तो डोळ्यांना चष्मा लावून शांतपणें तें प्रकरण वाचीत होता. त्याच्या चेहऱ्यावरची नसही हलत नव्हती. एकामागून एक ओळी तो वाचीत होता आणि पानामागून पानें उलटत होता.

आपला नवरा तत्वज्ञानाचीं पुस्तकं आवडीनं वाचतो हें तिला ठाऊक होतं. पण तो काय वाचतो हें तिनं त्याला कधीं विचारलं नव्हतं किंवा तें जाणून घेण्याचा तिनं प्रयत्नही केला नव्हता. तिचं जग आणि नवऱ्याचं जग अशीं दोन अगदींच निराळीं जगं एकाच घरांत एकमेकांशीं फटकून पण एकमेकांशीं वैर न करता समंजसपणें नांदत होती. तें जाणवून तिला स्वतःची लाज वाटली. तिला एकदम नवऱ्याची ओढ वाटूं लागली. त्याच्याशीं एकरूप व्हावसं वाटलं. ती नवऱ्याच्या जवळ आली आणि लाडानं त्याच्या केसांवरून हात फिरवीत म्हणाली, 'काय वाचतां ? मला सांगा ना !'

तिच्या नवऱ्यानं शांतपणानं तिचा हात दूर केला आणि तो पुढ्यांतलं पान वाचीत राहिला. तिचं मन दुखावलं गेलं. तिचे डोळे चटकन् पाण्यानं भरून आले. 'माझ्यापेक्षां हें तत्त्वज्ञान मोठं वाटतं तुम्हाला ? माझ्यांतून तुम्हाला कसलाच साक्षात्कार होत नाहीं का ? होणार नाहीं का ?' तिला नवऱ्याला काकुळतीनं विचारावसं वाटलं.

तिनं सहज समोर पाहिलं. ऊन आता उतरूं लागलं होतं. डोंगरावरून थंड वारं वाहूं लागलं होतं आणि मैदानातलं गवत हलकं हलके सळसळत होतं. डाव्या बाजूच्या टेकडीवरून तिरकस होऊं पहाणारे सौम्य सोनेरी किरण गवतावर पसरले होते आणि त्यांच्या प्रकाशांत गवतांचीं पातीं चैतन्यमय झाल्यासारखी भासत होती. थोड्याच वेळानं सूर्य मावळणार होता आणि समोरचे डोंगर किरमिजी रंगानं नाहून निघणार होते. तिनं नवऱ्याला हलवून म्हटलं, 'जरा फिरायला जाऊं या ना ! मुलीसुद्धां सडकेवर फिरायला गेल्या केव्हांच. जरा पाय मोकळे करून येऊं या.'

'ठीक आहे. जाऊं या,' तिचा नवरा नाइलाजानं उठून म्हणाला.

'माझ्याबरोबर खूप हिंडावं, फिरावं, फिरता फिरता खूप न बोलावं असं नाहीं वाटत तुम्हाला ?'

'वाटतं कीं ! मी कुठं नाहीं म्हणतो,' तो निर्जीवपणें म्हणाला.

'मला काय वाटतं सांगूं ! आपण दोघांनी उंच डोंगरावर जाऊन उभं रहावं, एकमेकांचे हात हातांत घट्ट धरावेत आणि सूर्य मावळेपर्यंत त्याच्याकडे टक लावून पहात रहावं. अगदीं मावळला तरी तिथंच सारखं पहात बसावं.'

'आतां डोंगरावर नको,' तो घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला, 'उगीच परतायला उशीर झाला–वाटेंत कांहीं जिवाणू पायाखालीं आलं–म्हणजे ? इथंच रस्त्यावर जरा फिरूं.'

एकमेकांशीं जुजबी आणि मामुली गोष्टी बोलत रस्त्यावरून एक चक्कर मारून तीं दोघें परत बंगल्यांत आली. तिला मघापेक्षां अधिकच खिन्न वाटूं लागलं.

रात्रीं बिछान्यावर पडल्यावरही तिला झोप येईना. तिचा नवरा व्हरांड्यांत दिवा लावून शांतपणें वाचीत बसला होता. ती बिछान्यावर एकटीच तळमळत होती. तिला पुन्हां भय वाटूं लागलं. बाहेर फुलूं लागलेल्या रातराणीचा गोड वास घरांत आला आणि मोठ्या प्रयासानं विसरून गेलेल्या त्या गंधाची आठवण पुन्हां जागी झाली. ती आठवण होताच ती भयंकर भ्याली. समजा, अचानक रात्रींच तो सुगंध दरवळत आला, त्यानं तें अगत्याचं, नाकारता न येणारं आमंत्रण काळ्याकुट्ट रात्रींतून पाठवलं तर...ती भयविव्हळ होऊन ह्या कुशीवरून त्या कुशीवर उलटी पालटी होऊं लागली.

तो गंध ! तो फक्त एकटीलाच जाणवलेला, एकटीलाच ठाऊक असलेला, तिच्या एकटीच्याच मालकीचा असलेला तो तिचा गंध ! शांत व्हायला, जीवनांतल्या कटकटी विसरायला ती इथं आली होती आणि इथं तिची मनःशांति नष्ट करून तिच्या अंतःकरणांत तगमग उठवणारा तो दुष्ट पण आकर्षक, क्रूर पण लोभ लावणारा गंध तिला भेटला होता. त्याचा उगम माहींत नसतांनाही आजवर अपरिचित असणारी एक विचित्र संवेदना निर्माण करून तो तिचें अंगोपांग व्यापूं पहात होता. तिच्यांत आजवर नसलेली उत्कटता आणि तडफड तिच्यांत पेरीत राहिला होता. भर रात्रीं तो गंध उसळून उठला तर...तर ती काय करणार होती ? त्या गंधाची वाट पहात ती सारखी स्वतःला जागृत ठेवण्याचा प्रयत्न करीत होती. तळमळता तळमळता तिला कधीं झोप लागली हेंच तिला समजलं नाहीं. बाहेरचा दिवा विझवून तिचा नवरा निमूटपणें तिच्या शेजारी केव्हां येऊन झोपला हेंही तिला उमगलं नाहीं. त्या गाढ झोंपेंतून पहाटे ती एका स्वप्नांत शिरली.

...ती त्या मुलाला विचारीत होती, 'तूं इथं मघापासून का थांबला आहेस ?' पण तो मुलगा नुसता हंसत होता. अगदीं खोचकपणें. त्याचा चेहरा तिला दिसतच नव्हता. फक्त त्याचं हसणं तेवढं दिसत होतं. तो ज्या झाडाखालीं उभा होता त्या झाडावर एकसुद्धां पान नव्हतं. फक्त तांबड्या रंगाचीं, रुंद पाकळ्यांचीं भलीं मोठीं फुलं दाटून फुललीं होती. जशीं कांहीं त्या झाडांवर फुलांची रासच ओतलीं होती कुणीतरी. जसं कांहीं झाडाचं काळीज फुटून चौफेर रक्ताच्या चिळकांड्या उसळल्या होत्या. झाडाखालीं असंख्य फुलं झडून पडलीं होतीं आणि तांबड्या रंगाचे शेकडो पक्षी तीं फुलं खात झाडाखालीं थय्याथय्यानं फिरत होते. रक्त रक्तांत मिसळत असल्यासारखें. त्या





फुलांना रंग होता पण वास मात्र मुळींच नव्हता. ते तांबडया रंगाचे पक्षी आणि तीं तांबडया रंगाचीं फुलं–त्या भडक तांबडेपणाचं तिला भय वाटत होतं. ती झाडापासून दूर दूर जाऊं लागली. पण कितीही दूर गेली तरी झाड नेमकं तिच्या जवळच उभं होतं. मग ती इतकी भ्याली कीं तिनं दोन्ही हात तोंडावर गच्च दाबून धरले–अगदीं गच्च दाबून धरले. इतके कीं तिचा श्वासही कोंडला......

ती दचकून जागी झाली तेव्हां तिनं आपले दोन्ही हात खरो-खरीच तोंडावर दाबून धरले होते आणि तिचं पोलकं घामानं चिंब भिजलं होतं.

तें भयानक तांबड्या रंगाचीं फुलं असलेलं झाड, ते उग्र तांबड्या रंगाचे चमत्कारिक पक्षी, तो अपरिचित पण खोचून हंसणारा मुलगा–तिला कशाचा कांहीं अर्थच कळेना. तें भडक तांबडें दडपण तिच्या छातीवरून दूरच होईना.

अचानक तिचं लक्ष खिडकीकडे गेलं–ओ हो ! बाहेरच्या टेकडी-वर चंद्र अचूक येऊन थांबला होता. पूर्ण आणि पिवळा रसरशीत. सौम्य, सुखद, शुभ्र प्रकाशानं सारी खोली माखून निघाली होती. तिचा नवरा आणि तिच्या मुली चांदण्यांत कांहीं अद्‌भूतच दिसत होत्या. तिनं नवऱ्याला गदगदा हलवलं,

'अहो उठा, तो चंद्र पहा किती सुंदर दिसतो आहे. असा सुरेख चंद्र मी जन्मांत पाहिला नव्हता.'

तिचा नवरा दचकून उठला. त्यानं चंद्राकडे क्षणभर पाहिलं. 'छान आहे,' तो पुटपुटला आणि तात्काळ झोपीं गेला. आपल्या सालस, सुस्वभावी, सज्जन, सरळ, चांगल्या आणि निरुपद्रवी नवऱ्याची तिला क्षणभर कींव वाटली. नवऱ्याला विसरून ती पुन्हां चंद्रावर नजर रोखून बिछान्यांत निश्चल बसून राहिली. हळूहळू चंद्र टेकडीआड होऊं लागला. त्याच्या पिवळ्या तेजांतून केशरी छटा उमलूं लागल्या. चंद्र टेकडीआड दिसेनासा झाला तेव्हां ती झटकन् उठली आणि डोक्यावरून पदर गुंडाळून घेऊन घरापुढच्या अंगणांत आली. एका शांत, निःशब्द पोकळींत ती धडधडत्या अंतःकरणानं उभी होती. कशाला तरी आठवीत–कशाची तरी वाट पहात–अकारण तळमळत–तिला माहीत नसलेल्या एका अनोळखी ध्यासाचे आघात झेलीत ती मावळत्या तांबुस चंद्राकडे पहात उभी होती. ती इथली नव्हती. इथल्या कु...चीही ती नव्हती. इथं तिचं कांहींच नव्हतं. मग तिचं होतं तरी काय ? तें कुठं होतं ?

ती मनांत नसतांनाही मंद गतीनं डोंगराच्या दिशेनं चालूं लागली. दूर कुठं तरी ओढ्यावरून रानकोंबडा आर्तपणें आरवत होता. तितक्याच दुरून तितक्याच आर्तपणें त्याला त्याची मादी प्रत्युत्तर देत होती. झुडपाझुडपांतलीं पाखरं मंजुळसं किलबिलत होतीं. एक करड्या रंगाचा रानससा तिची चाहूल लागताच बावरून टुण टुण उड्या मारीत झाडींत पळून गेला. पहाट फुलत होती. आणि रानांतले एकेक गंध आसमंतांत दरवळूं लागले होते. रानांतल्या काटेसावरीच्या उजाड फांद्यांवर तांबडी केशरी निर्गंध फुलं नुकतीच कुठं फुटूं लागलीं होतीं. त्यांच्यांतला मध खायला पाखरं एका झाडाभोंवती आशेनं फडफडूं लागली होती. एका झाडाचा पुष्पमय उद्रेक निरखीत तीं डोंगरावर थांबून राहिलीं तोंच......

पुन्हा त्या गंधानं तिला मिठी घातली. ती नखशिखांत दखळन निघाली. त्या ताज्या, टवटवीत, निर्मळ हवेतून तरळत, तरंगत आलेला मधुर सुगंध ती तहानलेल्या वाटसरूसारखी घटाघटा पिऊं लागली. तिची तहान अधिकाधिकच वाढत गेली. त्या गंधाचा विरह तिला सहन होईना. आतां नुसताच गंध नको होता, नुसताच आभास नको होता—आतां तिला प्रत्यक्ष तें झाड पहायचं होतं. ज्या फुलांतून हा गंध उसळत होता तें फूल डोळे भरून पहायचं होतं, हातांत धरायचं होतं, डोळ्यांवरून फिरवायचं होतं आणि मनसोक्त हुंगायचं होतं.

दक्षिणेकडच्या दाट झाडींतून हा वास पसरला होता. त्या झाडीला लागून तो खडकाळ कडा होता आणि कडयावरून पायथ्याकडे झरा झिरपत गेला होता. ती त्या झाडीच्या दिशेनं धावूं लागली. चंद्र मावळला होता आणि पूर्वेकडे भगव्या, गुलाबी तेजाच्या तलम छटा उजळूं लागल्या होत्या. खरं म्हणजे आतां घरीं परतायला हवं होतं. मुलं माणसं उठायची वेळ झाली होती. चहापाण्याची व्यवस्था पहायला हवी होती. पण ती तें सारं विसरून त्या झाडाचा शोध घेत सुटली होती.

त्या दाट झाडींत ती शिरली. तिथलं कुठलंच झाड तिच्या ओळ-खीचं नव्हतं. गोंधळून जाऊन ती प्रत्येक झाडाकडे पाहूं लागली. निर-निराळ्या झाडांना निरनिराळ्या प्रकारचे मोहोर फुटले होते. ती प्रत्येक झाडाखालीं जाऊन थबकूं लागली. पण छे ! तिला हवं असलेलं झाड तिथं नव्हतंच. मात्र तो सुगंध अधिकाधिक प्रज्वलित होऊन वातावरणां-तून गुंगी पसरवीत होता. हवेमधला अणुरेणु धुंद झाला होता. मातीच्या प्रत्येक कणाला त्या गंधानं मस्ती चढली होती. ती असहाय्यपणें त्या झाडींत बावरून उभी होती. तेवढ्यांत समोरून एक चौदा–पंधरा वर्षांची कातोड्याची पोरगी तिच्या रोखानं येतांना तिला दिसली. कमरेला विटक्या रंगाचं धडुतं गुंडाळून त्या धडुत्याच्या पदरांतच कांहीतरी गोळा करून घेऊन ती डोंगर उतरत होती. तिच्याकडे पाहून ती पोरगी हसली.

'सकालच्या पारीं रानांत कश्यापायीं आला वं बाई !' त्या मुलीनं तिला धीटपणें विचारलं.

'कांहीं नाहीं...सहजच,' तिनं चाचरत उत्तर दिलं. ती मुलगी तिच्या नजीक येऊन थबकली.

'म्होरं जाऊं नगा. रानामंदीं रस्ता गावायचा न्हाई' त्या मुलीनं म्हटलं. तिच्या पदरांत काळीं, रसरसलेलीं, टपोरी करवंदं भरली होती. त्यांतली मूठभर करवंदं उचलून त्या मुलीनं तीं तिच्या हातांत ठेवली. 'खावा,' ती मुलगी प्रेमळ स्वरांत म्हणाली. रानांत निर्भय संचार करणाऱ्या त्या वनबालेला आपलं मनोगत सांगावं असं तिला वाटलं.

'अग मुली, मला एक सांगशील काय ?' तिनं कळवळून विचारलं. ती मुलगी तिच्याकडे नुसती बघतच राहिली.

'हा सुंदर वास कुठून येतोय् ?' तिनं अनुकुल उत्तर न मिळ-ण्याच्या भयानं आधीच दाटून आलेली निराशा गिळून विचारलं. ती मुलगी खुदकन् हसली. वरच्या डोंगराच्या दिशेनं हात फेकून ती म्हणाली, 'अवं ह्यो तर खडकचापा फुलतुय बाई !'

'खडकचाफा !' तिनं आनंदानं सद्‌गदित होऊन विचारलं.

'व्हयना ? म्होरल्या रानांत त्याचं झाड हाये ! मस्नी हाये ठावुक. पन लई धोक्याची जागा हाये. पार कड्यावर चढाया होवं. आता पुनव आली ना ? ह्या वक्ताला निस्तं फुलून फुलून येईल पगा







अनुक्रमणिका

ते झाड ! दुसऱ्या पुनवेला मास्तर योक बी फूल गावनार न्हाई झाडा-वर.' समद्या डोंगरांवर योकच झाड हाये.

'तुला ठाऊक आहे तें झाड ? मला दाखवशील ? मला नेशील तिथं ?' तिनं हर्षानं थरथर कापत विचारलं. त्यावर त्या मुलीनं नाइलाजास्तव नाहीं म्हटलं. तिला लौकर घरीं पोचायला हवं होतं. कारण मग तिला करवंदं धुवून; तीं द्रोणांत भरुन स्टेशनांत विकायला जायचं होतं. पण दुसऱ्या दिवशीं पहाटें करवंदासाठीं रानाला जातांना त्या मुलीनं तिला हाक मारायचं कबुल केलं. ती ज्या बंगल्यांत उतरली होती तो बंगला त्या मुलीला माहीत होता. त्या मुलीनं तिला आणि तिच्या मुलीला त्या बंगल्यांत हिंडता फिरतांना पाहिलं होतं. दुसऱ्या दिवशीं करवंदं खुडायला जातांना पहाटें हाक मारायचं वचन देऊन ती मुलगी झराझरा डोंगर उतरून गेली.

पण दुसऱ्या दिवशीं कशी कुणास ठाऊक तिला गाढ झोप लागून गेली. ती उठली तेव्हां सकाळ उजाडून सूर्य चांगला कासराभर वर आला होता. उठताक्षणींच तिला त्या पोरीची आठवण झाली. ती मुलगी येऊन गेली कीं नाहीं हें कळायला कांहींच मार्ग नव्हता. आतां फिरुन ती पोरगी भेटेल कीं नाहीं हेंही सांगतां येण्याजोगं नव्हतं. मोठ्या मिनतवारीनं जुळून आलेला योग हुकला याबद्दल तिला विलक्षण हुरहूर लागून राहिली. खडकचाफा ! कुठंतरी कडेकपारींत अवघड जागीं उगवलेलं तें झाड सारखं तिच्या नजरेसमोर उभं राहूं लागलं. तें खडकांतून फुटलं होतं आणि थेट दरीवर पसरलं होतं. फुला-मागून फुलं उमलत होती, वाऱ्यावर गंध उधळीत होती आणि मग दरींतल्या काळोखांत गडप होत होती. असल्या अवघड झाडावर चढणार कोण ? दरीवर पसरलेल्या त्याच्या वेड्यावाकड्या फांद्यांवरचीं फुलं काढणार कोण ? तरीही ती प्रयत्न करुन पहाणार होती–निदान एखादं तरी फुल आठवणीदाखल घेऊन येणार होती. पण आतां—? सगळाच डाव हुकला होता. आंतल्या आंत तडफडत ती नित्यनैमित्तिक व्यवहार उरकण्याच्या कामाला लागली.

तितक्यांत 'बाईऽऽ, बाईऽऽ,' अशी हाक अंगणांत दणाणली. ती लगबगीनं बाहेर आली. ती कातोड्याची पोरगी हातांत एक फूल घेऊन उभी होती. त्या फुलाकडे बघण्याचा तिला धीरच होईना. प्राण डोळ्यांत आणून ज्या गंधकुसुमाची तिनं इतक्या उत्कंठेनं वाट पाहिली होती तें फूल आपणहून वाट चालत तिच्या दारीं आलं होतं. त्याचा तीव्र, सूक्ष्म, मधुर सुगंध तिच्या अंगणांत घमघमत होता.

'बाई, किती व बराडले, पन तुमाला जागच आली न्हाई. डोळ्यामंदली झोप हलली न्हाई जनु. पन म्या झाडाकडं जाऊन योक फूल काडलंन्. योकच गावलं. म्होरली फुलं काडायचं म्या वाटलं मस्नी. लई दूर व्हती पगा. घे ठिवून घ्या,' कातोड्याची मुलगी बडबडत सुटली.

तें फूल हातांत घेतांना तिचा हात थरथर कापत होता. ती तें हातांत घेते ना घेते तोच ती मुलगी निघून गेली सुद्धां. त्या फुलाकडे अनिमिष नेत्रांनीं ती पहात राहिली. पिवळ्या कोषांतून आवेगानें बाहेर फुटलेल्या जाड, रसरशीत, पाच तांबुस पाकळ्या...त्या पाकळ्यांच्या मधोमध फुलून उठलेला नागाच्या फण्यासारखा वळलेला भव्य परागकोश आणि त्या कोषांतून डौलानें वर उफाळून आलेले केशरी रंगाचे ताठ, रेशमी केसर...त्या प्रत्येक केस-राच्या टोकावर दाटून साकळलेल्या परागकणांतून गंध फेकला जात होता. असा गंध तिनें पूर्वी कधीं हुंगला नव्हता. तिचे पंचप्राण व्याकुळ करुन सोडणारा तो पाच पाकळ्यांतला दिव्य गंध ती हावऱ्यासारखी हुंगून पाहूं लागली. तो गंध तिला खाऊन टाकावासा वाटला. तो गंध आपलासा करावा, त्याच्याशीं एकरुप होऊन जावं आणि स्वतःला संपूर्ण विसरावं असं तिला क्षणभर वाटलं. तो तिचा अमोल ठेवा. तिनं हृदया-जवळ अलगद दाबून धरला. मुलींच्या नजरेला फूल पडूं नये, त्यांच्या धसमुसळेपणांत फुलाच्या पाकळ्यांना धक्का लागूं नये म्हणून एका रुमालांत गुंडाळून तिनं तें एका कपाटावर उंच जागीं ठेवलं. काम करतां करतां ती पुन्हा पुन्हा कपाटापाशीं जात होती, कुणाचं लक्ष नाहीं असं पाहून पुन्हां पुन्हां फुलाचं दर्शन घेत होती. एखाद्या लोभसवाण्या जिवंत कीटकासारखं तें फूल दिसत होतं.

खडकचाफ्याचं फूल ! सौंदर्याचा आणि सुगंधाचा एक लहानसा ठेवा ! पण त्या इवल्याश्या फुलानं दोन दिवसांत तिच्या मनोवृत्तीच बदलून टाकल्या होत्या. त्या सुगंधानं अनेक अननुभूत जाणिवा जाग्या केल्या होत्या. काम करतां करतां तिचे डोळे पाण्यानं सारखे भरून येत होते. तिला सारखं वाटत होतं–आपलं जीवन खोटं आहे, सामान्य आहे, नीरस आहे, फक्त कांहीं नियम सांभाळून यंत्रासारखं सुरळित चाललं आहे. आपल्या आयुष्यांत स्वास्थ्य आहे आणि म्हणूनच पुष्कळसं कांहींतरी त्यांत मुळीं नाहींच. कशाची तरी ओढ लागावी, धुंदी चढावी, त्या धुंदींत वर वर चढतां चढतां अशा एका उंचीला पोचावं कीं जगण्याचं सार्थक व्हावं–असा साक्षात्कार आपल्याला घडलेलाच नाहीं. ह्या सुगंधानं त्या साक्षात्काराची ओढ लावली पण तो साक्षात्कार? कसला साक्षात्कार ? कशाचा साक्षात्कार ? कशासाठीं तें स्वतःला विस-रून धांवत सुटणं ?

तिच्या डोक्यांत एकच गोंधळ उडाला होता. नुसते प्रश्न उभे रहात होते. आपलं निश्चितपणें काय हरवलं आहे हेंच तिला आकलेना. पण आपण अजून जगलोंच नाहीं असंच तिला एकसारखं वाटूं लागलं. हुंदक्यावर हुंदके दाटून येऊं लागले. हां हां म्हणतां त्यांचा स्फोट होऊं लागला. एकाएकी ती ढसाढसा रडूं लागली–तिची मधली मुलगी नेमकी पाणी प्यायला घरांत आली. आपली आई खिडकीच्या गजांवर डोकं टेवून समोरच्या टेकडीकडे पहात रडते आहे हें पाहून ती हलकेच वडलांकडे गेली आणि त्यांच्या कानांत तिनं हळूंच सांगितलं, 'बाबा, आई बघा, उगीच रडत बसली आहे वेड्यासारखी.'

तिचा नवरा झटकन उठून आंत आला. खरोखरीच खिडकी-पाशी उभी राहून ती रडत होती.

'अग रडतेस कशाला ? तुला झालंय काय ? बरं नाहीं वाटत का तुला ?' त्यानं तिच्याजवळ येऊन विचारलं. एव्हांना तिच्या साऱ्या मुलीहि तिच्या भोंवती गोळा झाल्या होत्या. ती एकदम घाबरली.

'कांहीं नाहीं...कांहीं नाहीं झालं हो मला' घाईघाईनं डोळे पुशीत ती म्हणाली.

'मग उगीच कशाला रडतेस ?'

'अशीच...'

'तुला कांहीं होतंय का ? मोकळ्या मनानं सांग तरी मला !'

'काऽऽही होत नाहीं मला. माझी तब्येत अगदीं उत्तम आहे. उलट तुम्ही मला इथं आणल्यापासून मला फार बरं वाटूं लागलंय'

...पान ५२ वर






पान २३ वरून

त्याला शिकवण्यांचा नसता उपद्व्याप केला नसता. कांहीं झालं तरी गोरा साहेब तो. पृथ्वी पालथी घालून आलेला. त्याला कळत नाहीं आणि याला कळतं अशी जगांत कोणतीच गोष्ट असूं शकेल होय ? पण हा सारासार विचार दाजीनं करायला हवा होता, तो नाहीं केला. केलं भांडण. साहेबाच्या टेबलावर सरळ राजिनामा भिरकावूनच तो बाहेर पडला. आणि इथं गांवीं आला तडफडायला. पण मिजास काय ? मान ही वर करून मोठ्या अभिमानानं अजून जेव्हां तेव्हां सांगत सुटायचा म्हातारा, 'अरे, या दाजी नाबरानं इंग्रज साहेबाला चक्क तोंडावर सांगितलं आहे–यू आर ए ब्रूट मिस्टर वॉटसन. वाटसन तूं राक्षस आहेस--काय ?'

दाजी सहकुटुंब गांवी परतला. आणि तशा नाबराच्या घरांत कटकटी सुरूं झाल्या. म्हणजे आधीं त्या नव्हत्या असें नाहीं. घरची इस्टेट फक्त दोघांनाच पडणार असं बाबू आणि बाळ्या धरून चालले होते. त्याच दृष्टीनं त्यांचे डावपेंच चालत, मसलती शिजत. थेरडा बाप उलथण्याचीच ते वाट बघत होते. पण कायम झालेली नोकरी सोडून इस्टेटीचा तिसरा भागीदार दाजी असा बेकार गांवी परतेल अशी दोघांना स्वप्नांतही कल्पना नव्हती. अचानक येऊन या दीडशहाण्यानं त्यांच्या आकांक्षांना जबरदस्त धक्का दिला. एक नवीनच समस्या निर्माण केली. ती सरळ सुटण्यासारखी नव्हती. आणि म्हणून बायकांत धुसपुस आणि बोलाचाली होऊं लागली. चांगल्या नोकरीवर, दूर कराचीला होता तोंवर दाजीला घरांत मान होता. षटी-षण्मासी येणार ! सहाजिकच त्याचा शब्द कोणी पडूं देत नसत. आतेबाईची तैनात संभाळण्यासाठीं तिच्याहून मानानं अन् वयानं वडील असलेल्या तिच्या जावांत चढाओढ लागे. दीड वर्षाच्या वासंतीचं खूप कौतुक करीत. पण तो जमाना आतां गेला होता. परिस्थिति बदलली होती. दाजी भावोजीकडून कांहीं प्राप्ती नव्हती. उलट आयतं गिळायला ती मंडळी आज इथं हक्कानं आली होती.

बाजूच्या काळोख्या खोलींत पुस्तकांत समाधी लावून दाजी रीहीं. तेव्हां प्रत्यक्ष त्याला कशाची झळ लागत नसे. आतेबाईला मात्र सगळं ऐकून घ्यावं लागे, नाहीं तें सहन करावं लागे. दिवस भला वर आला तरी तिच्या या मोठ्या जावा खोलीबाहेर येईनात. तशाच लोळत पडत. मुकाट्यानं आतेबाई स्वैंपाकाला लागे. फुंकणीनं फूऽऽफूऽऽ करीत चूल पेटवी. बिहिरीवर जाऊन पाणी भरूं लागे आणि तशीं एकूण एक काम तिच्या गळ्यांत पडत. आबाचं बाजून पाहून बोलणं तर, काळ नाहीं वेळ, सारखं चालूंच असायचं—'आयतं गिळायला मी म्हणतें माणसाला शरम कशी वाटत नाहीं ?' 'आयत्या बिळांतले नागोबा मेले. हूः !' 'साहेबाला बुद्ध शिकवूं गेला आणि भीक मागत आला–' हें असलं कुजकं अन् नासकं बोलणं. उलट कांहीं बोलूं म्हटलं कीं संपलंच. तिच्या जावा या गोष्टीची वाटच बघत असत. आणि कुत्रीं कशीं वसवसून अंगावर येत. नुसता भडीमार सुरूं करीत. उभं घर डोक्यावर उचलून घेत. सबंध दिवस घरचं वातावरण जड, मळभ भरावं तसं, भरलेलं आणि गदळलेलं राही.

पण हें जेव्हां रोजचंच झालं तेव्हां म्हाताऱ्या आबा नाबराला नाईलाजानं मध्यें पडावं लागलं. स्वतःच्या हातानं भरलं घर फोडण्याची पाळी बिचाऱ्यावर आली. त्यापेक्षां मरतां तर बरं होतं असं त्याला वाटलं. म्हणजे काय व्हायचं तें त्याच्या अपरोक्ष झालं असतं.

सकाळलाच एक दिवस आबानं तिन्ही मुलांना आपल्या खोलींत बोलावून घेतलं. सांगितलं, 'माझ्या समक्ष वाटण्या करून टाका.'

'कसल्या वाटण्या, आबा' दाजीनं विचारलं.

'माझ्या मढ्याच्या, कळलं ?' आबानं आवाज चढवला.

'कांहींतरीच काय बोलतां ?' बाबू आणि बाळ्या वरमून एकदमच म्हणाले.

तसा तो शीर्घकोपी म्हातारा उसळला, बरोबर बोलतो. 'तुमची खात्री नाहीं मला. उद्यां माझं मढं कोणी जाळावं म्हणून तुमच्या बायका घरांत वाद घालत बसतील. आणि बाईलबुद्धीचे तुम्ही बाहेर वाट बघत बसाल. म्हणून म्हणतो, वाटण्या करा ! सगळ्याच्या, माझ्या मढ्याच्यासुद्धां. मेल्यावर किडे पडायला नकोत मला. काय ?'

दाजी बापाला आवरीत म्हणाला, 'डोक्यांत राख घालण्यासारखं इतकं काय झालं आहे आबा !'

'तें तुझ्या बायकोला विचार जा. आणि तिलाच धाडून दे बाहेर. तुझा काय उपयोग नाहीं.' आबानं त्याला धुडकावून लावलं. 'अरे दाजी, तुझे हे दोन भाऊ तुझं वाटोळं करणार. कधीं शहाणा होणार आहेस तूं ?'

तसा बाबू मध्येंच गुरगुरला, 'त्यानंच आपल्या हातानं स्वतःचं वाटोळं केलं आहे.'

'अचरटासारखा नोकरी सोडून आयतं गिळायला घरीं आला. त्याच्या शिक्षणावर हजारबाराशें मोफत उडाले.' बाळ्यानं री ओढली.

'ऐक, ऐक हें ! आणि शहाणा असशील तर अजून सावध हो.' आबानं दाजीला हितांची गोष्ट सांगितली.

पण दाजी नाबरावर कशाचा कांहीं परिणाम झाला नाहीं. वाईट वाटलं त्याला. माणूसच होता. प्रत्यक्ष भाऊ उघड तोंडावर असं बोलतील याची त्याला कल्पना नव्हती. त्यानं एक निश्वास सोडला. भावांकडे एकवार पाहून उगाच हंसल्यासारखं केलं आणि शांतपणं म्हटलं. 'त्यांचं खरं आहे आबा. इस्टेटींत मला वाटणी नको.'

'आं !' म्हणजे बाबू आणि बाळ्यासुद्धां या विलक्षण वर्तनानं सर्द झाले. आपल्या या नुलखावेगळ्या धाकट्या भावाकडे संशयानें बघूं लागले.

दाजीचा म्हातारा बाप आबा तर आंवंढे गिळीत बसला. म्हणजे यावर पुढं काय बोलायचं त्याला कळेना. आपला हा पोरगा निव्वळ गाढव आहे याबद्दल त्याची खात्री पटलीच आणि तरीही तसं म्हणवेना. तोंडाचा इतका फटकळ ! पण जीभ अवघडली. अंतःकरणांत कुठंतरी अभिमानाची सुखसंवेदना झिणझिणली. म्हाताऱ्याला बरं वाटलं, जीवनाचं सार्थक झाल्यासारखं वाटलं.

'असं नाहीं होणार दाजी,' आबा गहिंवरून म्हणाला. त्याच्या डोळ्यांत पाणी होतं. 'तुझ्या वाटणीची इस्टेट तुला घ्यावीच लागेल.'

'नको आबा ! खरोखरच मला नको. माझ्यामुळं भावांचं नुकसान व्हावं असं मला वाटत नाहीं. दाजीनं ठाम निर्धारानं म्हटलं, 'इस्टेटीवरचा हक्क मी सोडून दिला.'

'नुसतं तोंडानं बोलून काय उपयोग ? स्टॅम्पावर लेखी लिहून द्यावं लागतं तसं.' त्याच्या थोरल्या भावनं-बाबूनं सांगितलं.

'तयार आहे मी' दाजीनं जाब दिला.

यावर आबा कांहीं बोलणार ! पण त्यापूर्वींच दाजी उठला आणि आंत आपल्या खोलीकडे वळला.

गांवांत लोकांना हा व्यवहार कळला, वाटण्या होऊन तिघे भाऊ विभक्त राहूं लागले तेव्हां. दाजी नाबराच्या नसत्या शहाणपणाचा हा दुसरा पुरावा. इस्टेटीवरचा हक्क सोडून देणाऱ्या माणसाबद्दल गांवांत कोणाला आदर वाटणं शक्यच नव्हतं. मेरेच्या एका दगडासाठीं मारामारी, कपाळफोड आणि कोर्टकचेऱ्या करणारीं माणसं ही ! दाजीच्या या बेताल करणीला हंसावं कीं रडावं त्यांना समजेना. आणि म्हणूनच कीं काय तें हंसत सुटले. पण









दाजीचा बाप आबा पक्का इरसाल होता. इस्टेटींत दोन आणे हिस्सा म्हाताऱ्यानं आपल्याकडे ठेवून दिला आणि तो स्वतः दाजीकडे राहूं लागला. राहतं घर, शेंछपन्न माडाचं खालचं कुळागर, बोबडोजीच्या वाड्यांत झिप्र्या बापलाकडे असलेली वायंगणी शेती आणि भीष्माच्या डोंगरावर सोळाव्या सर्व्हेंत मोडणारा भरड जमिनीचा तुकडा. म्हणजे तसं उत्पन्न फार नव्हतं. पण चार माणसांच्या कुटुंबाला तें कमी नव्हतं. झेपत होतं तोंवर वहिवाट आबानंच पाहिली आणि पुढं अगदीं थकला तेव्हां त्यांनीं ती सुनेकडे सोपवली. आतेबाईला व्यवहारांत चोख तयार केली. आणि तेव्हांच म्हाताऱ्यानं सुखानं डोळे मिटले. मरताना सुनेला बजावलं, ' माझ्या दाजीला संभाळ ! शापित आहे तो. म्हणूनच त्याच्या गुणांचं चीज नाहीं, होणार नाहीं. पण दाजी मोठा आहे ! देव माणूस, काय--देव माणूस—'

आतेबाई मोठी धीराची बाई. तशीच धोरणी, कर्तीसवर्ती. दाजीचा संसार तिनं नीट संभाळला, दृष्ट लागावी असा नेटका ठेवला. कुठं कमी पडूं दिलं नाहीं. तिच्या नवऱ्याचा नाहीं तरी घरप्रपंचाला उपयोग नव्हता. अगदीं तुकारामाचा अवतार ! दुसऱ्याचं दुःख, दैन्य दिसलं कीं हा विरघळलाच. आणि मग नेसलं वस्त्र सोडून देईल आणि स्वतः नागडा फिरेल. लोकं हंसली तरी पर्वा नाहीं, असा दाजीचा खाक्या. या अशा कलंदर माणसाचं घर राखणं काय सोपं काम होतं ? आपला प्रपंच काय आहे आणि तो कसा चालला आहे ते एक आतेबाईला ठाऊक आणि त्या खळनाथाला. खुद्द दाजीलासुद्धां पत्ता नव्हता. काळजीही नव्हती त्याला. त्याबद्दल त्यानं कधीं विचारच केला नव्हता.

विचार करण्यासारखे अनेक प्रश्न आणि समस्या देशापुढें असतांना स्वतःचा आणि स्वतःच्या प्रपंचाचा विचार करायला दाजीला सवड नव्हती. तो पुढारी होण्याच्या उद्योगाला लागला होता. चक्क कॉंग्रेसींत शिरला होता. आणि खादीचीं झुनेरं अंगावर चढवून गांवांतून मिरवूं लागला होता. ज्याला त्याला अक्कल शिकवी, उपदेश करी. त्याच्या ओटीवर गांवोगांवच्या कॉंग्रेसवाल्यांचा अड्डा पडलेला असे. ते चर्चा अन् खलबतं करीत, तोंडानं खूप बाता मारीत. घसा खरवडून एकएक ताकतावानं बोले. सूत्र एकच–आम्हांला स्वातंत्र्य पाहिजे !

गांवांत लोकांनीं आधींच ताडलं होतं कीं हीं चिन्हं बऱ्याचीं नाहींत. अवलक्षण दिसतं. आणि अखेर झालं तसंच ! बेचाळिसच्या ऑगस्टांत महात्माजींनीं ' चले जाव ' चळवळ पुकारली. इंग्रज सरकारनं गांधी-नेहरूंसकट सर्व लहानथोर पुढाऱ्यांना पकडून तुरुंगांत टाकलं. गांवांत ती बातमी वावटळीसारखी उडाली. तसा कुणीसा फतवा काढला. फटाक्याच्या माळा घेऊन दाजी नाबराच्या घरासमोर लोकं वाट बघत उभी राहिली. सात आठ दिवस असे गेले आणि मग एक दिवस फौजदार दाजीचा तपास करीत त्याच्या घरांत शिरला. चार दोन पोलिस बरोबर होते. दाजी ओटीवर होता. हातांत भला मोठा ग्रंथ. फौजदाराला बघून तो पुढं झाला. नमस्कार करून तो म्हणाला, तयारच आहे मी. '

' आय ॲम सॉरी मि. नाबर ', फौजदार देखील ओशाळला.

' चालायचंच ! तुम्ही तुमची ड्युटी करतां. आम्ही आमची. ' दाजीनं त्याला सांगितलं. ' पण लवकर आटपा. घरांत आमच्या हिला कळायला नको. '

फाटकावर लोकं टपून होतींच. त्यांनीं फटाके लावून दाजीची हूर्यो केली. जसा चोरी केल्याबद्दल त्याला पकडून नेत होते.

आतेबाई मागिलदारीं कुळागरांत शिंपण करीत होती. दाजीला पकडायला पोलिसचीं माणसं आल्याचं तिच्या कानीं गेलं. 'कुठं नेतां मेल्यांनो यांना ?' असा मोठ्यानं गळा काढीत ती घराकडे धांवली. पण उशीर झाला होता तिला. एव्हांना पोलिसचीं लोकं दाजीला घेऊन गेली होती. अवसान गळल्यासारखं होऊन ती तिथं पायरीवरच कोसळली. आणि तशी तिला सावध करण्यासाठीं लोकं धांवली...

पुढं दोन तीन वर्षांनीं दाजी सुटला. आला तो अधिकच शहाणा होऊन. टाळक्यांत भरमसाट विचार कोंबून, एक एक अफाट अन् अचाट कल्पना घेऊन, समाजशास्त्राचं तंत्र आणि मंत्र शिकून दाजी आतां कांहीं तरी बोलूं लागला होता आणि अशा भाषेंत कीं त्याचं बोलणं कोणाला खरं वाटूं नये. समजतच नव्हतं. समजण्यासारखही नव्हतं. त्याचंच त्याला कळतं कीं काय अशी लोकांना शंका येई. कॉंग्रेसनं स्वराज्य मिळवून दिलं. कॉंग्रेसच आतां सुराज्य स्थापन करणार ! महात्माजींचं रामराज्याचं स्वप्नं साकार होणार ! तो सांगे, लोक विचारीत रामराज्य म्हणजे विशेष काय ? दाजी सांगे–जनतेचं सुख, समृद्धि, समानता यावर आधारलेलं राज्य. सत्य, शांती, अहिंसा यांच्या शाश्वत पायावर उभारलेलं लोकराज्य.

म्हणजे काय ?--म्हणजे काय ?–म्हणजे काय ? लोकं गोंधळून विचारूं लागत. त्यांच्या गोंधळाचं निराकरण करतां करतां खुद्द दाजीच गोंधळून जाई. शब्दांच्या जंजाळांत आणि विचारांच्या गुंताव्यांत तो स्वतः हरवून बसे, हरून जाई. आणि तसा मग संतापून कांहींबाई बोलूं लागे. तिरसटासारखा अद्वातद्वा बडबडत सुटे. म्हणे ' अरे, श्रद्धा हवी, निष्ठा हवी. ती आहे तुमच्याकडे ? जा, आधीं ती साधना करा. मग मी काय सांगतो तें तुम्हांला कळेलं, पटेल'...

आपल्या सासऱ्यालासुद्धां दाजीनं अगदीं याच शब्दांत सुनावलं, जांवयाची खबर घेण्यासाठीं म्हातारा मुद्दाम सोलापुरांत आला होता. बडा माणूस होता तो, साखर कारखानदार. दाजीचा हलाखीचा संसार आणि तो संभाळण्यासाठीं पोरीला करावे लागणारे कबाडकष्ट त्याला बघवेनात. त्याला राहवलं नाहीं. उमाळ्यानं तो म्हणाला, ' जांवई बापू आम्हांला हें बघवत नाहीं. आमच्याबरोबर चला. कारखान्यांत चांगली नोकरी देतो. '

आतेबाईनं वडिलांना अर्ध्यावरच तोडलं, ' बाबा, काय हें ! छीः ! माणूस पाहून तरी बोलायचं.'

' तूं गप्प बैस, पोरी ! त्यांना तोंड आहे.' सासऱ्यानं सांगितलं.

' आहे तोंड आहे, डोकं आहे, हातपायसुद्धां आहेत, बाबासाहेब ' शांतपणं दाजी म्हणाला ' पण हें माझं नाहीं. गांवाचं आहे. होय, या माझ्या गांवाचं.' काय अर्धवट माणूस आहे अशा नजरेनं सासऱ्यानं जांवयाकडे पाहिलं. आणि तो पुटपुटला, ' पण गांवांत तर तुम्हांला–'

दाजीनं त्याचं वाक्य पुरं केलं, ' कोणी विचारत नाहीं. खरं आहे तुमचं. आणि म्हणूनच दुसरीकडं कुठं जाऊं शकत नाहीं मी ज्याला खुद्द स्वतःच्या गांवांत किंमत नाहीं त्याला बाहेर तरी ती काय असणार ?'

' हेच तें ! तुमच्यांत पुश नाहीं, ॲम्बीशन नाहीं, धडाडी नाहीं. आणि म्हणून तुम्हीं मागं पडलांत–' बाबासाहेबांतील साखर कारखानदार जागा झाला.

आणि इतकं झाल्यावर दाजी नाबर शांत राहील हें शक्य नव्हत. सासऱ्याकडे एक तुच्छ दृष्टिक्षेप टाकून उद्धटपणं तो म्हणाला, ' नाहीं, यापैकी माझ्यांत कांहीं नाहीं. आणि म्हणून मी मागं असलों तर जिथं आहे तिथंच मला राहूं द्या. उपकार होतील. तुम्ही जा पुढं ! पुश, ॲम्बीशन, धडाडी ! हूं ! ही असली हिंसक






हत्यारं द्या प्रत्येकाच्या हातांत. स्वार्थाची दारू पीत बसा. जीवघेण्या चढाओढी अन् स्पर्धा चालू ठेवा. हिंस्र श्वापदाचं जंगल बनविण्या-साठीं देश स्वतंत्र झाला नाहीं बाबासाहेब. गुलामांना आम्हांला माणसं बनवायचीं आहेत. सत्य, अहिंसा अन् शांती हीं शाश्वत मूल्यें जनतेंत रुजवायचीं आहेत. मानवांतील सद्‌गुणांना आवाहन करून महात्माजींच्या विश्वधर्माची जगांत प्रस्थापना करायची आहे...'

रात्रीं जेवणानंतर माजघरांत गोष्टी चालल्या होत्या. सासऱ्याशीं अधिक बोलण्यांत अर्थ नाहीं असं वाटून दाजी मध्येंच उठला आणि तडक आपल्या खोलीकडे चालता झाला.

मागं माजघरांत बराच वेळ दिवा पेटत होता. बापाचं लेकीशीं हितगुज चाललं होतं. दाजीचा सासरा गहिंवरून, कळवळून जोरजोरानं सांगत होता– 'बुडवलं, साफ बुडवलं तुला ! भिकाऱ्याच्या गळ्यांत बांधली ग !'

'दुःख करूं नका बाबा. माझं सोनं झालं–सोनं झालं.' आतेबाई त्याची समजूत घालीत होती आणि स्वतः मात्र रडत होती, हुंदके देत होती.

म्हणजे ती–ती–दाजीची बायको सुखी नव्हती ! सतरा–नाहीं अठरा वर्षं, ती त्याचा संसार करीत होती. पण दाजीला आज कळत होतं की आतेबाईला सुख नव्हतं-समाधान नव्हतं !

या जाणीवेनं भोंवऱ्यांत सांपडावा तसा तो गरगरला, हादरला, दुभंगला. अंतर्मुख होऊन विचार करूं लागला. ती सारी रात्र दाजीचा डोळा लागला नाहीं. अंधारांत वर आढ्याकडे डोळे लावून तो तळमळत होता......

आणखी नशिबानं पुढं दिवससुद्धां असे येऊं लागले कीं दाजीची झोंप उडावी. करकर विचार करूनही आकलन होऊं नयेत अशा एक एक घटना घडाव्यात. कॉंग्रेसनं इतकी वर्षं उराशीं जतन करून ठेवलेलीं स्वप्नं, ध्येयं, आदर्श–अरेरे ! तोंडानं त्यांचाच पुरस्कार करीत सत्ताधीश कॉंग्रेस प्रत्यक्षांत अगदीं विरुद्ध आचार करीत होती. शब्दांचे अर्थ जरूरीप्रमाणं बदलत होते, तत्त्वांना व्यवहाराच्या सोयीनुसार मुरड पडत होती. काय चाललं आहे हें ? काय होणार आहे उद्यां ?–असा संभ्रम जाणत्या अन् निष्ठावंत कॉंग्रेसजनांत माजावा ! अशी परि-स्थिती उत्पन्न झाली होती. कालची सत्याग्रही कॉंग्रेस आणि आजची सत्ताधारी कॉंग्रेस–अंतर वाढलं होतं, वाढत होतं...आणि–आणि झाला महात्माजींचा वध. ती बातमी कळतांच दाजी नाबराची वाचा बसली. तो सैरवैर झाला. दार बंद करुन त्यानं स्वतःला खोलींत कोंडून घेतलं. गांधीजींच्या सत्याचे प्रयोगाची मोठ्यानं पारायणं चालविलीं. अन्न नाहीं, पाणी नाहीं ! चार दिवस तसाच उपासतापास करीत राहिला. दारीं येऊन आतेबाई धरणं धरून बसे, रडे, चिडे, वैतागानं म्हणे, 'दार उघडा. नाहीं तर हिथंच कपाळ आपटून जीव देतें.' पण दाजी हटत नसे, तुटत नसे दार उघडायला उठत नसे. झपाटलेल्या स्वरांत तो आंतून ओरडे, पापी–पापी आहांत तुम्ही ! देवाच्या रक्तांत हात रंगलेत तुमचे ! निघून जा, जा, चालते व्हा !' आणि हें जसं गांवांत झालं तशी लोकं दाजी नाबराच्या घराकडे लोटलीं. ओटीवर गर्दी करून राहिली. आतेबाईचं सांतवन करूं लागली. सांगूं लागली-दाजीचं कधीं तरी हें असं होणार याचा त्यांना अंदाज होता. बरेंपणी तरी काय ? तसा वेडसरच तो ! आतां तर मस्तकच फिरवून बसला. एक हे खूळ, शिवाय दोन पोरं पदरांत. आतेबाईवर कठीण प्रसंग आला होता. वैऱ्यावरही येऊं नये असा–म्हणजे लोकंच असं कांहींबाही बोलूं लागली कीं, दाजीच्या बायकोचासुद्धां धीर सुटे. अवसान गळे, कपाळावर हात मारून ती रडत बसे. श्रीकांत आणि वासंती तर पोरंच ! आईला बिलगून तीं मोठ्यानें गळा काढीत. आणि पांचव्या दिवशीं अण्णागुरुजी धांवत आला. गांवांतील हा दुसरा शहाणा खुळा ! –सड्यावर त्याची खाजगी शाळा होती.

अण्णागुरुजी आला तोच ओरडत, 'दाजी, अरे आहेस घरांत.' म्हणजे गांवांत असूनही त्याला पत्ताच नव्हता अजून, कोणीसं सांगितलं कीं दाजी नाबराला खुळ लागलंय, आणि तसा हातांतली काठी उगारून दुर्वासासारखा अण्णा गुरुजी त्याच्या अंगावर धांवून गेला. ओरडला, 'भांचोद ! असलं अभद्र बोललास तर जीभ उखडून टाकीन. आतेबाई, हा दाजी कुटं मेला ?'

आतेबाईनं आंतून बंद असलेल्या खोलीकडे बोट दाखवलं, अण्णागुरुजीनं खणखणीत आवा-जांत बाहेरून पुकारलं, 'दाजी नाबरा, दार उघड. अरे, नाना कांबळ्यानं जीव दिला. तुझ्या या रामज्यांत सरळ माणसाला जगणं अशक्य आहे बाबा.'

त्यांतले फक्त 'जीव दिला' हे दोनच शब्द दाजीच्या कानीं गेले. काळीज चिरत शिरले. तो ताडकन् उठला. कडी काढून बाहेर आला. 'कोणी जीव दिला अण्णा ?'

'दुसऱ्या कोणी ? नाना कांबळ्यानं.'

'नानानं ? कां ?'

'तें त्यालाच विचारायला हवं. पण तो तर मरुन गेला. घरांतच वर आढ्याला दोरखंड अडकवून फांस घेतलान्. रडायला सुद्धां कोणी नाहीं त्याचं सगळं तुला आणि मलाच करावं लागणार. चलतोस ना ?'

'अरेरे ! मनानं मोठा होता नाना.' दाजी हळहळला, 'एक चांगला माणूस गेला.'

'परवाचीच गोष्ट ! गांधींचा खून झाला या गोष्टीवर विश्वास ठेवायलाच नाना तयार नव्हता. त्याला वाटलं गांवांत लोकं आपली चेष्टा करतात. त्यांना शिवीगाळ करीत तो माझ्याकडे आला. माझ्याशीं हुज्जत घालीत बसला. असं होणं शक्य नाहीं. देवाचा अवतार तो, त्याच्यावर हात कोण उगारील ? आणि समजा उगारला तरी तो मरेलच कसा ?–असा वाद घालीत बसला. तेव्हां 'लोकमान्यां'-तील इत्यंभूत वृत्तान्त नानाला मी वाचून दाखविला. आसूं गाळत, मधूनमधून हुंदके देत त्यानं तो ऐकला आणि संपलं तसं डोळे पुशीत रडतच म्हणाला—'जगण्यांत राम नाहीं राहिला गुरुजी.' तो तरळ चालूं लागला आणि आज ऐकतों तर हा प्रकार.' अण्णागुरुजीनं गहिंवरून आठवण सांगितली.

एक जड सुस्कारा टाकून दाजी हताश स्वरांत पुटपुटला, 'खळनाथा, तुझी रे इच्छा !'...

देशांत चालूं असलेल्या बऱ्यावाईटाची; विशेषतः वाईटाची, जबाबदारी खळनाथावर होती ! ती त्याला घेणं भागच होतं. काय बिशाद नाहीं म्हणेल ? त्याला बोलतां येत नव्हतं. खरं होतं ! पाषाणाच्या खळनाथाला बोलतां येत नव्हतं. आणि दाजीला दुसरं काय बोलावं कळत नव्हतं ! तो भांबावून गेला होता, गोंधळांत पडला होता. म्हणजे सगळेंच विपरीत होत होतं. कांहींही आणि कसंहि ! कशाला कांहीं सुमारच नव्हता, अर्थ नव्हता, हेतू नव्हता आणि असलाच तर दाजीला तो सरळ दिसत नव्हता. त्याचा भ्रमनिरास झाला होता. कदाचित् भ्रमही असावा. सहसा तो बोलत नसे. पुरांत बुडालेल्या घरावर उभा असल्यासारखा व्यग्र आणि चिंताक्रांत चेहऱ्यानं बघत राही. शून्याचा शोध घेत, क्षितिजं उभवीत, वर्तुळांत फिरत, अन्ताच्या क्षणाची वाट बघत... •••

पान १७ वरून

बदलून ती म्हणाली, 'हें बघ, उद्यां आपणाला शिवाजी पार्कला जायचंय ना? लक्षांत आहे कीं नाहीं?'

'शिवाजी पार्कला?'

'उद्यां शनिवार नाहीं का? शनिवारीं माझ्या शिवाजी पार्कच्या मावशीनं बोलावलंय आपणा दोघांना जेवायला. त्या दिवशीं रात्रीं हॉलवर नाहीं कां सांगितल?'

'असेल.' त्याला कांहींच आठवत नव्हतं.

'तिथं जाऊन काय करायचं?'

'जेवायचं!' ती हंसून म्हणाली. आणि एखादें गुपित सांगितल्यासारखें करीत म्हणाली, 'तिथं मावशीजवळ मी हा विषय काढणार आहे. मावशीचे यजमान बिल्डिंग कॉंट्रॅक्टर आहेत. ते आपल्यासाठीं कांहींतरी खटपट करतील—'

'पण तिथपर्यंत ही जागा राहील का?'

'एका दिवसानं काय होणार आहे?'

'व्हायचं झालं तर एका तासानं सुद्धां होतं.' आणि किंचित् नरमाईच्या सुरांत तो म्हणाला, 'मलासुद्धां ही जागा आवडली आहे असं नाहीं. पण करणार काय? अडला हरी—'

'खरं आहे.' ती तेवढाच धागा पकडून म्हणाली, 'उद्यां आधीं पार्ल्याला जाऊन पाहूंया. नाहीं तर मग पाहूं—अं?'

'हां.' मोठ्या मिनतवारीनें त्यानें तें मान्य केलें.

पण तरीसुद्धां तो स्वस्थ बसला नाहीं. रात्रीं खानावळींत त्याला आणखी एका जागेचा तलास लागला. जागा अंधेरीला होती. वर्षभराच्या करारानें ती मिळण्यासारखी होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून तडक तो अंधेरीला गेला. पण खोलीच्या मालकाला दरमहा शंभर रुपये हवे होते. तो निराश होऊन परतला. महिना पावणेदोनशें प्राप्ति—त्यांतले शंभर भाड्याला गेल्यावर संसार करणार कसला?

संध्याकाळीं सुनंदाच्या माहेरीं आल्यावर हताशपणें सुनंदाला तो म्हणाला, 'यापेक्षां वर्षभर थांबलों असतों लग्नाचें तर काय बिघडलं असतं? पण तुझ्या वडलांना घाई लागली ना?'

'नुसतं लग्नाचं थांबून काय उपयोग?' ती हंसत म्हणाली, 'बरोबर भटकायचं थांबला असतास वर्षभर?'

'नुसतं भटकलों असतों तर काय बिघडणार होतं?'

'जाऊं दे.' ती हंसतच म्हणाली, 'मुलीचा बाप झाल्याशिवाय तें कळायचं नाहीं.'

बोलतां बोलतांच आपल्या शब्दांतून उमटलेला दूरान्वय लक्षांत येऊन ती स्वतःच चपापली. पण त्याच्या तें लक्षांत आलें नाहीं. तो आपल्याच तंद्रींत म्हणाला, 'बरोबर. तूं आईबापांचीच बाजू घेणार.'

'त्यांची घेतें तर आपलं लग्न झालं नसतं. उगीच वितंडवाद घालण्यांत अर्थ नाहीं.' ती आवरतें घेऊन म्हणाली, 'शिवाजी पार्कला जायचंय, लक्षांत आहे कां?'

मग ती नवें केशरी पातळ नेसली. सगळा साज चढवून थोड्याच वेळांत ती त्याच्याबरोबर बाहेर पडली. रात्रीच्या प्रकाशांत उजळलेली तिची मुसमुसती कांति आणि ताज्या वेणींतला गंध त्याच्या डोळ्यांत, कानांत गच्च भरला—आणि कालपासूनची चिडाचीड तो क्षणांत विसरला. भारल्यासारखा तिच्याबरोबर चालूं लागला.

सुनंदाच्या मावशीची जागा छानच होती. तीन खोल्या, चोवीस तास नळ, संडास, बाथरूम, चकचकीत फर्शी, टापटिपीनें मांडलेलें उंची फर्निचर, बाहेरचा सहा बाय आठचा व्हरांडा... त्या व्हरांड्याचीच एक छोटी खोली झाली होती. पण त्यांत एक गब्दुल माजलेला कुत्रा आरामसारखा अस्ताव्यस्त पडला होता. हळूच त्या कुत्र्याला तो म्हणाला, 'मजा आहे तुझी बेट्या!'

बाहेर दादरची चौपाटी दिसत होती. समुद्राचा खारा वारा खिडक्यांतून घोंघावत होता. आणि किनाऱ्यावर फुटणाऱ्या लाटांचा आवाज सारखा कानांत भरत होता. दिव्यांच्या प्रकाशांत चमचमणाऱ्या त्या समुद्राकडे अरविंदा वेड्यासारखा पहात बसला होता.

हातपाय धुण्यासाठीं मागच्या बाजूला तो गेला, तर तिथंसुद्धां एका चौकोनी खोक्यांत एक गुबगुबीत मांजरी पिलांना घेऊन सुस्त निजली होती. न राहवून सुनंदाला तो म्हणाला,

'बघ, ह्या मांजरीचीसुद्धां खोली आहे!'

मावशीच्या विनोदीं गप्पाटप्पा झाल्या, जेवण झालें, जागेच्या प्रश्नावर चर्चा झाली, पण सगळा कोरडा कारभार होता. सगळें बोलणें तुटक, दबून—बेतून चालल्यासारखें होतें. जेवण झाल्यानंतर अरविंदाला बाहेर मावशीच्या यजमानांच्या ताब्यांत देऊन सुनंदा किती तरी वेळ आंतच मावशीच्या गोतावळ्यांत गुंतली होती. साडेदहा वाजून गेल्यानंतर सुनंदा बाहेर येऊन त्याला विचारूं लागली, 'चलायचं ना?'

'आं?' झोपेंतून जागा झाल्यासारखें अरविंदानें विचारलें.

'अकरा वाजायला आले, निघूं या आतां.'

'हो—निघूं या.'

ओढून काढल्यासारखा अरविंदा उठला. मावशीच्या आणि तिच्या यजमानांच्या तीं दोघें पायां पडलीं. त्यावर पुन्हा अनेच येण्याचा आग्रह झाला. आणि पायांत बेड्या अडकवल्यासारखें अरविंदानें बूट चढवले.

बाहेर पडल्यावर त्यांच्या लक्षांत आलें कीं, आतां बस लवकर मिळणें कठीण आहे. दादर स्टेशनचा रस्ता पकडल्यावर इतका वेळ कोंडून धरलेला प्रश्न अरविंदानें बाहेर काढला—

'काय म्हणाली मावशी?'

'काय म्हणणार?'

'कांहींच नाहीं ना?'

'हां—म्हणजे जागेचंच ना?'

'तेंहि तुझ्या लक्षांत नाहीं. मग मावशी काय कपाळ म्हणणार?'

'अरे पण—'

'मला वाटलं होतं—'

'काय वाटलं होतं?'

'एवढं तूं मावशीचं म्हणत होतीस, तर मावशी म्हणेल, आजची रात्र आतां इथेंच राहा. पण तीहि तुझ्या आईचीच बहीण—!'

'तुझीसुद्धां कमाल आहे. आजुबाजूला पाहायचं नाहीं, परिस्थिति पहायची नाहीं—'

'तुझ्या मावशीलासुद्धां परिस्थिति आहे का?'

'सांग ना काय तें, सांगितल्याशिवाय कसं कळेल?'

'सगळं सांगतें—मावशीसुद्धां त्या खटपटींत आहे. पण आधीं स्टेशनांत जाऊं या. मला या गल्लीबोळांत सुचत नाहीं. भीति वाटते. रस्त्याला माणूस सुद्धां दिसत नाहीं. चला बघूं भरभरा.'

मावशी त्याच खटपटींत आहे?— म्हणजे दुसरी कांहीं सोय करणारहेत कीं काय? आजुबाजूला एखादी जागा सुचवणारहेत कीं काय?

कुठें तरी आशेचे पाखरूं चिवचिवलें. तो भराभर पाय टाकूं लागला. तरीसुद्धां एक प्रश्न सुटत नव्हता—सगळें टाऊक असतांना एवढ्या बाईंनी मांची निघल्यावर मावशीनें





औपचारिकपणेंसुद्धां असें कधें म्हटलें नाहीं, कीं आजची रात्र आतां इथेंच राहा ?...

एवढा वेळ पेटलेली रात्र वेगानें मालवत होती. रस्टाल्वर दिवे विझत होते, दारें-खिडक्या बंद होत होतीं चोहीं दिशांनी दाटणारा काळोख अरविंदाच्या डोळ्यांत येत होता.

मागें सामुद्राच्या अनंत लाटा उसळी मारून येत होत्या, आणि दगडी कठड्यावर आपटून फुटत होत्या. पुन्हा पुन्हा झेप घेऊन येत होत्या, आणि हार खाऊन आंतल्या आंत गुदमरत होत्या. नुसतीच खळबळ माजवून विरत होत्या.

तो कमालीचा अस्वस्थ झाला होता. निमूट-पणें तो तिच्याबरोबर चालत होता. जवळ असूनहि अनंत योजनें दूर असल्यासारखी ती बाजूनें चालली होती. मनाशीं त्यानें निश्चय करून टाकला कीं, तिच्या मावशीकडून तात्कडतोब कांहीं जमण्यासारखं नसेल तर ग्रँट-रोडची ती जागा उद्यां घेऊन टाकायची.

थिएटरजवळ आल्यावर ती म्हणाली, ' विडा घे ना —'

'काय करायचा नुसता विडा ?' दुबळें हसून चेष्टेच्या स्वरांत तो म्हणाला, ' रंगणार आहे थोडाच ?'

' असं काय वेड्यासारखं—'

'मला नको. तुला हवा तर घे.'

' निरुपायानें ती गप्प बसली. शक्यतों त्याच्याजवळून, त्याला खेटून चालूं लागली. त्याला बोलता करण्याचा दुसरा कोणताच उपाय तिला सुचत नव्हता.

तीं दोघं दादर स्टेशनांत आलीं तेव्हां साडेअकरा वाजले होते. आणखी पांच-सात मिनिटांत गाडी येणार होती. अर्ध्या तासाच्या आंत तीं चर्नीरोडला पोंचणार होती. तिथून पांच मिनिटांत पुन्हा त्यांचे रस्ते वेगळे पडणार होते. आजचा दिवस असाच वणवण हिंडण्यांत गेला. हीहि रात्र उसासे टाकीत जाणार...

पुढें जाऊन अरविंदा तिकिटें काढूं लागला. तशी जवळ येऊन हळूंच ती म्हणाली, ' पहिल्या वर्गाचीं काढ. '

' कशाला ? '

' तेवढंच टॅक्सींत बसल्यासारखं वाटेल. '

' त्यानं काय होणार आहे ? '

' दोन शब्द मोकळेपणानं बोलतां येतील. '

वाघिणीसारखी मुसंडी मारीत आगगाडी स्टेशनांत भरली. अरविंदाचें लक्ष नव्हतें. सुनंदानें पटकन् त्याचा हात मागें ओढला. तो टोकाला उभा होता, आणि समोरच्या इमारतीं-तल्या बंद खिडक्यांत नजर देऊन राहिला होता.

गाडींत फारशी गर्दी नव्हती. पहिल्या वर्गाच्या सबंध डब्यांत अवघीं सहा माणसें होतीं. एका पारशी जोडप्याच्या मागें कोपऱ्यां-तली जागा पकडून तीं बसलीं आणि अधीरतेनें त्यानें एवढा वेळ मनांत दाबून धरलेला प्रश्न काढला, ' मग काय म्हणाली मावशी तुझी ?'

' ती म्हणते थोडं थांबा—'

' हें सांगायला तुझी मावशी कशाला हवी ?'

' पुरतं ऐकून तरी घे. एक जागा आहे पार्ल्याला. मावशीच्या यजमानांच्या ओळखीनें मिळण्यासारखी आहे. पण भाडें पाऊणशें रुपये पडेल—'

' पाऊणशें ?' क्षणभर तो गप्पच बसला. पण मग विचार करून म्हणाला, ' हरकत नाहीं. पण लगेच नक्की करून टाकायला हवी. तेवढें टाकूनहि घेणारे लोक आहेत. जागा केवढी आहे ?'

' जागा म्हणजे ब्लॉक आहे तो. जागा फार सुंदर आहे म्हणत होती मावशी—'

' मिळणार केव्हां ती ?'

खटपट करतेय मावशी. खालीं व्हायला हवी ना ? दोनतीन महिन्यांत रिकामी होईल म्हणते.

' हं: !–म्हणजे समजलं !' तो एकदम तडकला.

' काय समजलं ?'

' खोली नाहीं ! दोनाचे तीन, तिनाचे चार, चाराचे सहा–त्याला कांहीं सुमारच नाहीं.'

' तुझ्या अधीरतेला कुठें सुमार आहे ?'

' समजलं. '

असं काय करतोस ? मावशी आणखीहि-कुठें कुठें चौकशी करणार आहे. '

चिडून त्यानें विचारलें, ' ते जाऊं दे-पण एवढी रात्र झाली, आतां इथंच राहा म्हणाली असती तुझी मावशी तर काय हरकत होती ? '

' तुला वेड लागण्याची पाळी आली आहे. तुला माहीत आहे, त्या डाव्या बाजूच्या खोलींत मावशीची बाळंतीण मुलगी आहे. तिचा दीड महिन्याचा मुलगा दोन दिवस तापानं फण-फणतो आहे. आतां तुला खरं सांगतें, मावशी राहा म्हणत होती, पण मीच म्हटलं नको म्हणून !'

ओठांनी खुंटलें. नजर खिडकीबाहेर काढून तो हताशपणें पाहूं लागला. बाहेर काळोख वाढत होता. रात्र चढत होती. आणि त्याची नजर धगधगत होती.

त्याचा अबोल घुमेपणा तिला बोचकारूं लागला. तिला वाटलें, त्याच्याजवळ जाऊन त्याची समजूत घालावी, धीर द्यावा. ती त्याला बिलगून बसली. त्याचा हात हातांत घेऊन म्हणाली, ' असं काय करतोस ? चिडून कसं चालेल ? इकडे बघ–'

तिच्या लाडिक शब्दांनीं तो विरघळला, आणि त्यानें इकडे पाहिलें. तिच्या रंगलेल्या लाल लाल ओठांत, तिच्या हसऱ्या डोळ्यांत नजर खुपसून तो म्हणाला, ' काय करायचं इकडे बघून ? नुसतं पाहायचं आणि श्वास टाकीत बसायचं ! '

' तूं इतका वेडा असशील असं वाटलं नव्हतं. लग्नापूर्वी केवढ्या गप्पा मारीत होतास. संयमानं वागायचं, पांच वर्षें मूल होऊं द्यायचं नाहीं !–आणि लग्न होऊन चार दिवस झाले नाहींत तर ही अवस्था–'

कांहीं तरी बडबडूं नकोस. वेड्यासारखं काय वागलों मी ! इतके दिवस थांबलों. आतां सगळं झालं. लग्न झालं, कायद्याचीं, रूढींचीं बंधनं आपण पाळलीं. आतां किती दिवस मन मारायचं ? तूं ही गोष्ट कुठवर समजून. पुरुषाच्या शरीराची आग—'

' सगळं ठाऊक आहे.' ती हंसून म्हणाली, मलाहि शरीर आहे. मलाहि खूप वाटतं—'

' काय वाटतं ?' एकदम अधीर होऊन त्यानें विचारलें.

' जें तुला वाटत तेंच !'

' खरं !' त्यानें झटकन् तिचे दोन्ही हात पकडले.

' चावळट आहेस.' आणि ती मोठ्यानें हंसली. पटकन् वळून तिनें डब्यांत सर्वत्र पाहिलें. डब्यात आतां फक्त तें पारशी जोडपें उरलें होतें. पण तीं आपल्यातच दंग होतीं. आणि त्यांतला तो तिच्या तोंडात तोंड घातल्यासारखा बोलत होता.

अरविंदानें सुनंदाला तें दाखवलें, आणि तिचा हात दाबला. हळूंच तिच्या तळहाताला चिमटा काढला. थांबलेली गाडी स्टेशनांतून पडली, आणि न राहून पटकन् त्यानें तिचें चुंबन घेतलें.

ती इतकी गरमली–चौफेर पाहून ती म्हणाली, 'हें काय ?' आपण कुठं आहोत– शुद्धीवर आहेस कां ? तिथें तें पारशी जोडपं–'

तो तिला अधिकच लगटून म्हणाला, 'त्यांना कुठें आहे वेळ आपल्याकडे पाहायला ? तीं आपल्यासारखीं विचार करीत नाहीं बसत.'

महालक्ष्मी स्टेशन आलें आणि तें पारशी जोडपेंहि निघून गेलें. डब्यांत आतां त्या दोघांखेरीज कोणी नव्हतें. पहिल्या वर्गाचा तो सबंध डबा निर्मनुष्य दिसत होता. तो मोकळेपणा त्याच्या डोळ्यांत चढला आणि त्याच्या डोळ्यांत वीज लकाकली.

तो वर उठला. मागेपुढें जाऊन त्यानें डब्यांत सर्वत्र पाहिलें. त्या दोघांखेरीज आंत कोणी म्हणजे कोणी नव्हतें.

गाडी सुटून स्टेशनच्याबाहेर पडली. आवेगानें तो जवळ आला आणि सुनंदाचे दोन्ही हात पकडून विचारूं लागला, 'काय ग ?'

'काय ?'

'खोली मिळेपर्यंत आपण ही खोली समजायची ! ' आणि पुढें तो विचारूं लागला, 'काय वाईट आहे ? काय हरकत आहे ?

'चल !' तिनें त्याला झटकल्यासारखें केलें.

पण त्या कल्पनेनें तीहि गुदगुदल्या झाल्यासारखी हंसली. त्यासरशीं त्याची नजर पिसाट झाली. तिच्या डोळ्यांत खोल उतरली आणि काय होतेंय हें कळण्यापूर्वी तिच्याहि पापण्या अचानक जड झाल्या. स्वतःला आवरण्याचें भानच ती एका क्षणांत हरवून बसली. पाहतां पाहतां डब्यांतला सगळा प्रकाश तिच्या पापण्यांत गडप झाला. चुरगळलेल्या वेणीच्या सुगंधांत बाहेरचें जग बुडून गेलें.

एका अननुभूत कैफाच्या तंद्रींत तिनें किलकिल्या डोळ्यांनीं त्याच्या डोळ्यांत पाहिलें. पण तिथें फक्त दबलेला पिसाट राक्षस होता.

त्याला पाहून खाडकन् तिची तंद्री उतरली आणि एकदम तिच्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहिला. क्षणाक्षणाला तो सारखा वाढूं लागला. इतक्या वेगानें कीं पाहतां पाहतां तो अरविंदा एवढा दिसूं लागला.

पण अरविंदाला यांतलें कांहींच ठाऊक नव्हतें. वेड्यासारखा तो आपल्याच नादांत मश्गुल होता !

●●●

---

पान ४६ वरून

' मग अशी का वागतेस ? घटकेंत स्वतःशीच हसतेस–घटकेंत खिन्न होऊन बसतेस–घटकेंत एकटीच कोपऱ्यांत जाऊन रडतेस–तुझ्या मनाला कांहींतरी लागलंय का ?'

' नाहीं हो मुळींच नाहीं.'

' आज दोनतीन दिवस पाहतोय–एकटीच डोंगरावर धावत जातेस.'

' व्यायाम नको का घ्यायला !'

तिची धाकटी मुलगी टाळी वाजवून म्हणाली,' बाबा मी सांगूं ? आईच्या हातांतली अंगठी हरवलीय् डोंगरावर. म्हणून ती शोधायला वर जाते आणि आतां सापडत नाहीं म्हणून रडत बसलीय.'

' चल ग वेडे,' ती हसून बोलली.

' तुझं कांहीं हरवलंय का इथं ? ' तिच्या नवऱ्यानं विचारलं.

' हो...अं...नाहीं हो...कांहीसुद्धां हरवलं नाहीं माझं. '

' हरवलं तर हरवलं...एवढं काय मनाला लावून घ्यायचं ! ' तिचा नवरा निष्कपटपणें म्हणाला.

तिचे डोळे फिरून पाण्यानं भरून आले. आपला कृपाळू, इमानी, साधासुधाच पण दयाळू नवरा, आपल्या गोंडस, गोड मुली, आपला नीटनेटका संसार, आपलं सुखी, स्वस्थ जीवन—सारं कांहीं जाणवून ती पुन्हां स्फुंदूं लागली. सारं कांहीं ठाकठीक होतं–पण तिला सुखी होता येत नव्हतं. तिला हवं असलेलं कांहीं तरी त्यांत नव्हतं. तिला हवं होतं तरी काय ? फक्त एक तीव्र ओढ ? पण कशाची ? कशाची ? ?

तिचे डोळे पाण्यानें डबडबलेले पाहून तिचा नवरा म्हणाला, उगीच कांहींतरी खुसपट मनांत काढून रडतीयेस झालं. चला, आपण सर्वजण बाहेर फिरायला जाऊं. आज स्वयंपाक करूं नकोस. आपण सगळे बाहेरच जेऊं. आज सारा दिवस बाहेरच भटकूं. '

तिच्या नवऱ्यानं तसं म्हणतांच तिच्या मुलींना कोण आनंद झाला. आपले नवे फ्रॉक काढायला लगेच त्या ट्रंकेकडे धावल्या. मग तीही डोळे पुसून कपडे करायच्या तयारीला लागली. भराभरा तयार होऊन सर्व मंडळी बंगल्याबाहेर पडली. आपल्या मनांतला नवऱ्याला नी मुलींना कांहीं समजूं नये म्हणून चालता चालता ती खोट्या आनंदाचा आव आणून एकसारखी बडबडत सुटली.

संध्याकाळीं दमून भागून सारीजणं घरीं परतली. तिचं मन एव्हांना पुष्कळच शांत झालं होतं. त्या फुलाची आठवण येऊन ती आधीं कपाटाकडे धावली. कपाटावरचा रुमाल हातांत घेऊन तिनं तो उलगडला. पण...

पण खडकचाफ्याचं फूलं मावळलं होतं. त्याच्या पाचही पाकळ्या मिटून गेल्या होत्या. त्याचा गंध उडून गेला होता. फुलाचं जीवन संपलं होतं. एखाद्या हिरमुसलेल्या, दुःखीकष्टी माणसाप्रमाणं तें आपलं चैतन्य गुंडाळून घेऊन नष्ट होण्याच्या मार्गाला लागलं होतं. तिनं त्याला हुंगून पाहिलं. कसला तरी विचित्र, कडवट आणि शिळा वास येत होता त्याला. कांहीं क्षणासाठीं दरवळलेला तो उन्मत्त, पिसाट आणि मोकाट सुगंध वातावरणांत विरून गेला होता.

तिचा हिरमोड झाला. तिला त्या फुलाची अवस्था बघवेना. हताशपणें तिनं तें फूल रुमालांत गुंडाळून पुन्हां कपाटावर फेकून दिलं– पुन्हां त्याला हात न लावण्याच्या निश्चयानं. मनांत दरवळणारा तो सुगंधही तिनं ज्या उत्तुंग कड्यावरून उधळत आला होता त्या कड्यावरच भिरकावून दिला.'

'खडकचाफ्या...खडकचाफ्या...', ती कळवळून स्वतःशीच म्हणाली, ' तूं तिकडं सुखांत रहा. तुला वर्षानुवर्षें असाच बहर येऊं दे...तुझा गंध मैलोन मैल असाच दुमदुमूं दे...तुला कांहीं मी पाहिलं नाहीं...पहाणारही नाहीं...पण सुखी ऐस बाबा...सुखी ऐस... आणि मलाही इथं सुखांत राहूं दे. तूं तिथं अन् मी इथं. '

आणि मग तिला स्वतःचंच हसूं आलं.

ती उगीच वेडी झाली होती.

पण ती वेडी झाली होती !

वेडी होऊं शकली होती...

●●●



**होमगार्ड .....**

नागरी संरक्षणाचा पाईक !

नागरी संरक्षणाची आघाडी मजबूत
करण्यासाठी होमगार्ड व ग्रामसेना
दलांत दुबळी व कमकुवत माणसे
...कामी असून शरीरानें बळकट
...ानें खंबीर माणसेच हवीत.

**...णाची दुसरी आघाडी**

बळकट करण्याकरीतां

**..... दारूबंदी .........**









## ईर्षा तेवत ठेवा

भारतावर चीननें आक्रमण केलें आणि स्वातंत्र्यानंतरच्या सुरुवातीच्या सुखी आणि स्थिर जीवनाला अचानक धक्का दिला. ह्या मित्राच्या (?) आकस्मिक हल्ल्यानें असिद्ध भारतीय नेत्यांना आणि फौजेला सुरुवातीला माघार घ्यावी लागली तरी ह्या संकटाची तीव्र जाणीव व सर्वनाशी व्याप्ति जाणवताच अटीतटीनें शत्रूला सामना देऊन अचानक हल्ल्याचा प्रतिसाद अनपेक्षित शौर्यबलानें देऊन त्याच्या विजयाच्या सुखस्वप्नांना धूळमाती चारण्यांत आली. अहिंसावादी मित्राच्या ह्या प्रखर धडाक्याने हतबुद्ध झालेल्या लाल चीननें कोणत्या तरी नाममात्र निमित्तानें अधिक संघर्ष टाळून एकतर्फी समझोता जाहीर केला व यशस्वी माघार अचानक घेतली. हिमालयाच्या अभेद्य तटबंदींत ह्या लाल घुशींच्या बिळांनीं पाडलेल्या खिंडारामुळें झालेलें नुकसान पूर्णपणें भरून निघालेलें नाहीं. दांत आणि नखें क्षणभर बधिर झालेल्या ह्या मूषकांची पुन्हां चढाई केव्हां होईल तें सांगतां येत नाहीं अशी नेत्यांनीं जाहीर व सतत ललकारी देऊन आगामी वावटळीसाठीं घर स्थिरस्थावर व बळकट राखण्याचा आदेश दिला आहे. नेत्यांच्या ह्या दूरदृष्टी सावधगिरीनें जनता आपला आळस झाडून सर्वतया सामर्थ्यशील बनून स्वातंत्र्यरक्षणास सिद्ध झाली आहे. 'रक्त, धन आणि श्रम देशासाठीं द्या ' हें नेत्यांचें आवाहन जनतेनें शिरोधार्य मानून आपापल्या ताकदीप्रमाणें आणि कुवतीप्रमाणें तें तें दिलेलें आहे आणि देत आहे. संरक्षण निधी वाढविण्यासाठीं निरनिराळे उपक्रम योजिले जात आहेत आणि ते यशस्वीही होत आहेत. उत्फूर्त वर्गणी, देणगी, कर, काटकसर आणि देहदान ह्यांनीं संरक्षणाची बैठक दिवसेदिवस भरभक्कम होत आहे. आणि संभाव्य हल्ल्याच्या अपेक्षेनें सर्व आघाड्यांवर जागृति आणि सुसज्जता सिध्द झाली आहे. 'इंच इंच लढवूं' ही वृत्ति अशा सर्व प्रयत्नांनीं सतत तेवत ठेवली पाहिजे तरच स्वातंत्र्याचें रक्षण होऊन शत्रूंच्या विश्वासघाती डावांचा पुरा निःपात होईल.

●●●

## सरकारी साहित्य स्पर्धेंचा ' निकाल '

मराठी साहित्याला उत्तेजन देणाऱ्या सद्हेतूनें मराठी साहित्यांतील निवडक (आणि परिक्षकाच्या अल्पमतानें आणि बहुमतानें उत्कृष्ट ठरलेल्या) साहित्यकृतींना प्रतिवर्षी पारितोषिकें देण्यांत येतात. ह्यासाठीं सरकार एक समिती नेमते आणि तिचें सदस्यत्व गुप्त राखिलें जातें. सरकारी शासनयंत्राच्या गुप्त मानल्या जाणाऱ्या सगळ्या कागदपत्रांना ज्या मार्गानें सहज प्रसिद्धी मिळून कर्णोपकर्णी त्याची गुप्तता जाहीर होते त्याच मार्गानें (आणि आपलें सदस्यत्व मिरविण्याची अनिवार हौस असणाऱ्या सदस्यांच्या आगाऊ वृत्तीमुळें) हें गुप्त सदस्यत्व प्राथमिक अवस्थेंत जगजाहीर होत असतें. सामान्यतः सरकारदरबारीं ज्यांचें वजन आहे असें जडदेहाचें आणि अन्नोलवृत्तीचे सभासद ह्या सरकारी समित्यांत अंतर्भूत होतात. प्रस्तुत साहित्यसमितीबद्दलच बोलावयाचे म्हटल्यास ज्यांचा साहित्याशीं मुतराम् संबंध नाहीं किंवा ज्यांचा उगाच निष्कारण गवगवा झाला आहे असे सभासद निवडल्यास समतोल समन्वय साधून शिवाय साहित्यिक मूल्यमापनांत (आवश्यक नसलेली) सहिष्णुता, सहानभूति व सामाजिक दृष्टि सहज साधतां येते. ग्रंथ उशिरां प्रसिद्ध होऊनही मागच्या अनुकूल तारखेच्या ट्रेडमार्कानें त्याला यादींत समाविष्ट करणें, वृत्तपत्रीय वशिल्यावर आणि अनुकूल हंडीबागांकडून त्यावर वेळींच ठाशीव अभिप्राय लिहून घेणें आणि मान्यवर सदस्यांना त्याच्या भेटप्रति पाठवणें इत्यादि उपायांनीं कांहीं प्रकाशक निकाल राखीव ठेवतात तर कांहीं समिती सदस्यांची रटाळ प्रस्तावनां, फुटकळ लेखन किंवा उद्घाटनी मानपान सांभाळून सरकारदरबारीं आगाऊ दळणवळण ठेवतात. जर बिचाऱ्या छोट्या लेखकांनीं आणि त्यांच्या तितक्याच छोट्या प्रकाशकांनीं भक्तिभावानें ह्या सोडतीचें तिकिट मिळविण्यासाठीं यत्न केला तर पहिल्याच फेरींत ते भुईसपाट होतात (किंवा केले जातात) आणि उत्तेजनार्ह पारितोषिकही त्यांच्या मौलिक साहित्यकृतीला मिळूं शकत नाहीं. इतिहासाची पुनरावृत्ती होते असें म्हणतात तें ह्या सरकारी पारितोषिकाच्या यथाक्रम, यथाकाल आणि यथेच्छ निकालानें सहज पटतें. आणि नेमेचि एवढें होऊनसुद्धां भाबडेपणानें व लाभाच्या आणि मानाच्या अपेक्षेनें प्रतिवर्षी अनेक होतकरू लेखक ह्या साहित्य स्पर्धेंत उतरतात आणि अपेक्षित निकालांत ते अनुल्लेखित ठरतात. भारतीय घटनेनें लोकशाही समाजवादाचें कंकण नागरिकांच्या हातांत बांधल्यामुळें राजकारणी फडांत हातवारे करणाऱ्या प्रचारकांनाच जशी निरक्षर जनता हात वर करून मत देते तसेंच उमेदवाराच्या निवडणूकं पूर्व प्रचाराच्या आधारें आणि धारेनें साहित्य समितीचे सदस्यही घायाळ आणि विव्हल होऊन मतप्रदर्शन करतात कीं काय असें ह्या निकालावरून पुष्कळदां प्रतीत होतें. राजकीय निवडणुकींत अनेक उमदेवार उभे असले तरी बहुमताच्या गणनेवर एकच उमेदवार प्रथम येतो. पण ह्या साहित्यिक निवडणुकींत हा एकतर्फी निवडवाद अपौष्ठिक ठरल्यामुळें 'तुझें भलें, माझें भलें आणि सर्वांचेंच भले' ह्या न्यायानें अनेक उमेदवार प्रथम श्रेणींतच नव्हे तर पहिल्याच क्रमांकावरही लुकलुकतांना आढळतात. ही सरकारी निवडीची प्रथा सर्वंकष सर्वतुष्ट समाजवाद रूढ करणारी अतएव उपयुक्त आहे आणि म्हणूनच साहित्यिक



अनुक्रमणिका

मूल्यमापनाच्या मान्यवर तत्वप्रणालींत तिचा वेळींच अंतर्भाव व्हावा अशी राष्ट्रहिताच्या दृष्टीनें विनंति करावीशीं वाटतें. समितीचे सभासद समजुतदार आहेत हें मराठी साहित्याचे खरोखरीं भाग्य समजावयाचें. कारण ' तुझ्याला नाहीं, माझ्याला नाहीं तर घाल कुत्र्याला, अशा आततायी कुविचाराला बळी न पडतां इसापनीतींतल्या तात्पर्याप्रमाणें वागून संवर्गाचा निकाल ( सर्वांनाच ) आणि सर्वच गुलदस्तांत ठेवून समजुतीनें ते लावतात. उपस्थित मान्यवर सदस्यांच्या पूर्वग्रही मतांना मान तुकवून अपेक्षित सान्मान्य लेखकाला अनुल्लेखानें मारण्यांतच अहिंसावाद व समतोल वृत्ति (आणि सूडबुद्धि) कशी राखवतां येते हें ह्या सरकारी साहित्य मूल्यमापन समितीच्या गुप्त शासनयंत्रणेवरून होतकरू चाणक्याना शिकतां येईल. मार्च महिना आला कीं ह्या समितीची धांदल सुरू होते. ऐन फाल्गुनापूर्वींही निवडीच्या वावड्या आणि निकाली कुस्त्यांचा शिमगा गल्लीबोळांतल्या मजलशींत सुरू होतो. उन्हाळयाच्या सूचक सुरवातींत उग्र साहित्याची तगमग अधिकच तीव्र होते. ' जयराम सांगेचे अपेक्षित घोडे तुरे खोवून अभिनंदनाला सिद्ध होतात आणि त्यावर टिप्स् देणारे आणि घेणारे 'डबल ट्रिबल', ' विनप्लेस'ची भाषा बोलूं लागतात. निकाल जाहीर झाल्यानंतर यथावकाश त्याचें शवच्छेदन पडलेले घोडे हिरीरीनें करतात तर तगलेले योद्धे आणि तगवणारे कोटिबुद्धे सुटकेचा निश्वास टाकीत पुढील कार्यक्रमाचें चिंतन करतात. मग (आधींच ठरवलेले) सत्कार होतात आणि हीं साहित्यिक बिरुदें सरकारी आदेशान्वयें ग्रंथालयांच्या फलकांवर विराजतात. उत्साही वाचकांच्या मागण्यांच्या उधाणामुळें ग्रंथालयाच्या तुटपुंज्या अर्थकलशाला तडा जातो–अनुग्रहीत प्रकाशक ( घाऊक विक्रीला कीं ठोकळ रद्दीला काढावयाच्या ) मालावरसी धूळ झटकून पुन्हां एकदां उत्साहानें लेखकाच्या मौलिक मान्यतेचा बाजार उभा करतो. ह्या एकंदर उपक्रमाचें सव्यापसव्य झाल्यानंतर प्रश्न उरतो कीं ह्या सट्टयांत शहाणा कोण ? मान्यवर समिती सभासद, धूर्त प्रकाशक ( मासिकाचें मानधन, प्रकाशकाची टक्केवारी आणि सरकारी मान्यतेची सरदेशमुखी अशा ) तिपेडी अनुग्रहानें कृतकृत्य झालेला लेखक कीं एवढया चतुरस्र मान्यतेच्या भडिमारानें पस्तावलेला वाचक ! सुज्ञास अधिक सांगणे नलगे.

•••

# आणखी कांहीं नवे उपक्रम

संरक्षणनिधीच्या वाढीसाठीं ठिकठिकाणीं जे उपक्रम होत आहेत त्यांत गेल्या महिन्याच्या सतारा तारखेला मुंबईच्या ब्रॉम्बे जिमखान्यावर झालेल्या मुख्यमंत्री संघ विरुद्ध महापौर संघाच्या क्रिकेटच्या सामन्याचा विशेष उल्लेख केला पाहिजे. युद्धजन्य परिस्थितीमुळें अनेकांना नकोत ते (किंवा न जमणारे) उपद्व्याप करणें प्राप्त ठरलें आहे. मुख्यमंत्री कन्नमवार ह्यांनीं आजपर्यंतच्या आयुष्यांत वृत्तपत्रें विकलीं, आगगाडीची तिकिटें तपासलीं, साप्ताहिकें चालविलीं, कायदेभंग केला, राष्ट्रसेवा केली आणि राजकारणही केलें. ह्या धकाधकीच्या जीवनांत हौसेनें त्यांना बॅट धरण्याची कधीं संधी मिळाली नव्हती. ती त्यांची हौस आणि त्यांना तसें करतांना पाहण्याची प्रेक्षकांची हौस प्रस्तुत सामन्यानें फिटली. एक रंगा सोहनी सोडून मुख्य मंत्र्याच्या संघांत प्रगट कंदुकक्रीडा करण्याचें प्रसंगावधान कुणाला असल्याचें आजपर्यंत ज्ञात नव्हतें. महापौर संघांत मात्र शालेय व महाविद्यालयीन जीवनांत मैदानावर उतरलेले खेळाडू किंवा एल. पी. जायसारखा चौरंगी हिरो आणि दिलीपकुमारसारखा आकर्षक सितारा असल्यामुळें त्यांची बाजू बळकट होती. ह्या सामन्याच्या वैचित्र्यामुळें त्याला मिळालेलें गर्दीचें यश तसेंच संघरक्षितांचा पराक्रम वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाला. तो वाचून ह्या अपूर्व उपक्रमाचें फलित साध्य झाल्याचें सिद्ध झालें आहे. भर दुपारीं उघड्या मैदानांत हा सामना चालला असतां असूर्यपश्या शामियानांत जड जेवणानंतर आळसावलेल्या प्रेक्षकांचें भाग्य फुकटया होळकरी प्रेक्षकांना जरी मिळालें नाहीं तरी ' तुमचा खेळ होतो पण आमचा जीव जातो ' अशी कुणी तक्रार केली नाहीं. उलट हॅटी चढवून, टोप्यांत कागदाचे शिरपेंच खोवून, रुमालाचें शिरस्त्राण करून मांडया मोडून बसलेले. किंवा एका पायावर उभे असलेले हजारो प्रेक्षक सभोंवार पाहून अनभिज्ञ खेळाडूनांही आपली सुप्त पात्रता पटविण्याचा उत्साह प्राप्त झाला.

ह्या कार्यक्रमाची योजना ज्या कल्पक मेंदूतून निघाली असेल त्याला धन्यवाद देणें युक्त ठरेल. वास्तविक महापालिका विरुद्ध राज्यसरकार अशा झालेल्या ह्या सामन्यांत सरकारच्या संघाचे कप्तान स्थानिकस्वराज्य मंत्री होणें अधिक इष्ट ठरलें असतें. कारण महापालिका संघ (वा शिष्टमंडळ ) ह्यांचा कागदी सामना ह्या मंत्र्यांशीं सतत होत असतो आणि महापालिकेच्या रास्त मागण्या ' नो बॉल ' टाकून परतवण्याची प्रस्तुत मंत्र्यांना संवय असतेच. ह्यामुळें चेव येऊन 'बॉडी लाइन' चेंडूफेक करून आपल्या आजवरच्या अन्यायाचा सूड घेण्यास महापलिकासंघाला अधिकच चेव आला असता व ह्या वीरश्रीच्या हल्ल्यामुळें सुरक्षित मंत्र्यांतला एखादा मुरारबाजीही पराक्रम करून गेला असता.

ह्या कार्यक्रमासारखे आणखी रंजक कार्यक्रम वा उपक्रम अनेक करतां येऊन संरक्षणनिधी वाढवण्याचा आणि आत्मसंरक्षणाचें शिक्षण मिळण्याचा दुहेरी फायदा सहज साधतां येईल. मुंबई महापालिका आणि राज्य विधिमंडळात फाल्गुनी पौर्णिमेच्या रात्रीं तिकिट घेणाऱ्या प्रेक्षकांसाठीं खास अधिवेशन भरून स्वैर वक्तृत्वाची धूळवड साजरी करणें, तसेंच अश्लील वाङ्मयाचें प्रदर्शन व कथाकथन इत्यादि आकर्षक उपक्रमही गल्लेभरू ठरतील. शिवाजी उद्यानांत तज्ञ पतीपत्नींच्या भेंड्या, सवालजबाब वा नेपथ्यपाठांचें नाट्यदर्शन, जार्ज फर्नांडिस व अप्पा पेंडसे ह्यांची वल्लभभाइ स्टेडियमवर निकाली कुस्ती, संक्रांतीच्या अनुरूप मुहूर्तदिनीं कम्युनिस्टांच्या वावडीस्पर्धा, रिपब्लिकन पक्षाच्या दुरुस्तना-दुरुस्त संघांचे नरेपार्कवर श्रमदान, वठलेल्या नटनटींच्या, अनुक्रमें स्त्री–पुरुष भूमिकांत बसवलेला ' म्हातारपणाच्या डोहाळ्यांचा संगीत नाट्यप्रयोग पोस्टखातें, स्वच्छताखातें आणि रेल्वे कर्मचाऱ्यांचा संयुक्त सौजन्य सप्ताह इत्यादि अनेक हमखास अर्थसिद्ध कार्यक्रम आयोजितां येतील. सरकारचे कल्पक प्रसिद्धीखातें ह्या सूचनाची दखल घेईल काय ?

•••




# साहित्य सेवक शेलारमामा

एप्रिल महिन्याच्या २७ तारखेस सुप्रसिद्ध चतुरस्र साहित्यिक श्री. भा. वि. तथा मामा वरेरकर ह्यांना ऐंशीं वर्षे पूर्ण होऊन ते एक्या-ऐंशींव्या वर्षांत पदार्पण करीत आहेत. ह्या त्यांच्या वाढदिवशीं मुंबईत व महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं त्यांचे सत्कार समारंभ साजरे होणार आहेत. अठ्ठावीस कादंबऱ्या, पांच कथासंग्रह, कित्येक डझनवारी नाटकें व एकांकिका, अनुवादित शरदसाहित्य, टागोर व बंकीम-वाङ्मय, चार खंडी नाटकी संसार, कांहीं मराठी बोलपटकथा व अगणित स्फुट लेखन अशी मामांनीं आजपर्यंत भरगच्च साहित्य-सेवा केलेली आहे. त्यांच्या 'विधवाकुमारी-' सारख्या कादंबरीनें साहित्य जगतांत मोठें कुतुहल आणि वादळ निर्माण केलें होतें. सुबोध व अस्सल मराठी भाषा आणि चुरचुरीत संवाद लिहिण्यांत त्यांचा हात कोणीही धरूं शकलेला नाहीं. आपल्या साहित्यावरच उपजीविका करणारा त्यांच्यासारखा साहित्यिक खडतर परिस्थितीतही आपली वैचारिक पातळी सोडून कधींही खालीं उतरला नाहीं हा त्यांचा चारित्र्यविशेष उल्लेखनीय आहे. पूर्वायुष्यांत केलेल्या ह्या खडतर एकांकी तपश्चर्येचें फळ त्यांना उत्तरायुष्यात मिळालें. पार्लमेंटचें नियुक्त सदस्यत्व तसेंच साहित्य अकादमी व संगीत नाटक अकादमीचें सदस्यत्व त्यांना प्राप्त झालें. तें त्यांच्या ह्या व दर्जेदार साहित्य नाट्य-सेवेमुळें असें म्हणणें युक्त आहे. विद्यापीठांत प्रवेश करण्याची जरी संधी त्यांना व्यक्तिशः मिळाली नाहीं तरी विद्यापीठाच्या दर-बारात त्यांच्या साहित्यकृति गेलीं कित्येक वर्षे सतत विराजत आहेत. गेल्या व चालू पिढीच्या विद्यार्थ्यांत शालेय वा महा-विद्यालयीन अभ्यासक्रमांत मामांच्या किमान कांहीं निवडक साहित्यविशेषांचा ज्याचा परिचय झाला नाहीं असा विद्यार्थी सांपडणें विरळाच. गोदू गोखले, बिजली, मंजुळा, चिमणी, ह्या मामांच्या मानसकन्यांनीं स्त्रियांचे कैवारी म्हणून मामांना साहित्यांत, रंगभूमीवर आणि समाजजीवनांत अजरामर करून ठेवलेलं आहे. कामगार नाट्य मंडळांना मामांचा फार मोठा आधार वाटावा इतकी मामांनीं त्यांची जपणूक केली आहे. गप्पा, विडी, खाद्य आणि लेखन ही मामांची चार व्यसनें ख्यातनाम आहेत. दिल्लींतल्या त्यांच्या अलिकडच्या वास्त-व्यांत अभ्यागत महाराष्ट्रियांना आणि विशेषतः साहित्यिकांना मुक्तद्वार आदरातिथ्यानें त्यांनीं हक्काचें माहेर मिळवून दिलें आहे. परभाषिक साहित्यांत मामांच्या अनेक साहित्यकृति अनु-वादित झाल्या असल्यामुळें भारतांत मामांची विशिष्ट साहित्यसेवा अज्ञात राहिलेली नाहीं. मराठी भाषेची मामांनीं केलेली ही सेवा विद्यापीठांनीं अप्रत्यक्षपणें आजवर मान्य केलेलीच आहे. त्यांच्यासारख्या साहित्य तपस्व्याचा गौरव त्यांच्या ह्या वाढदिवसा-निमित्तानें विद्यापीठांनीं त्यांना डॉक्टरेट देऊन केल्यास तो सार्थ ठरेल. ह्या उतार वयां-तहि मामांची प्रकृति, वाणी, वाचन आणि लेखन निरामय आहे. ह्या सारस्वताच्या आधार-वडाला अधिकाधिक स्वास्थ व आरोग्य प्राप्त होवो व तो भावी काळांत अधिक पल्लवीत होवो ही त्यांच्या ह्या वाढदिवसानिमित्त आमची नम्र प्रार्थना आहे.

—सारस्वत

# जमीन आणि गणित

मराठी साहित्यांत वरच्या दर्जाचें विनोदी लेखक म्हणून मान्यता पावलेल्या श्री. वसंत सबनीसांचे 'निळावंती' हे प्रयोगानुक्रमानें पहिले नाटक.

तमाशांत नाचणारी बाई व एक शाळा-मास्तर यांची ही कहाणी. मनाविरुद्ध तमाशांत नाचणाऱ्या निळावंतीशी मास्तर विवाह करतात. पुढं दारिद्र्याशीं तोंड देण्यासाठीं ती मास्तरांची समजूत घालून चित्रपटात काम करण्यासाठीं अचानक आलेल्या संधीचा फायदा घेते. निळावंतीची 'नीलादेवी' होतांच खरा संघर्ष निर्माण होतो. तकलादू मोठेपणांत मास्तरांची निळा हरवते, त्यांना सांपडेनाशी होते. एकेकाळीं मास्तरांचा वाटणारा आधार आतां तिला भार वाटूं लागतो. मास्तरांची गरज संपते आणि नाटकाच्या अखेरीस 'आचार्यां'ना सूर सांपडतो, तसं मास्तरांना, 'मास्तर असूनसुद्धां गणित चुकलं माझं. रीतीचे सुद्धां मार्क देतां येणार नाहींत' असं उत्तर सांपडतं. जुना, हूड विद्यार्थी गेन्या 'प्रत्तेक पिकाची टरल्याली जिमीन इाय. ततच त्ये मूळ धरतं' हे तात्पर्य व्यवहारी अपूर्णांक मास्तरांना समजावून सांगतो. विनोदी संवादांतील खुसखुशीतपणा, कथानकां-तील आकर्षकता व प्रणय प्रसंगांतील हळुवार-पणा यांनी 'निळावंती' सजली आहे. मूळ कथेंत संघर्षाला व नाट्याला भरपूर वाव आहे. पण नाटकांत हा संघर्ष तीव्र स्वरूप धारण करीत नाहीं—संघर्षाच्या प्रसंगांतील अनावश्यक कंटाळवाणी लांबण, विचार व आशय ह्यांची पुनरुक्ति व विनोदाच्या अतिरेकामुळें. विनोदाची चुरचुरीत परिचित पखरण सबनीसांनी मुक्त हस्तानें केली आहे. त्यामुळें गंभीर प्रसंगा-तील उत्कटता, भावुकता, गुदमरते. विनोदाला असलेली गांभीर्याची किनार प्रेक्षकांच्या नजरें-तून निसटते. फक्त विनोदाची वीणच ते न्याहाळतात. प्रसन्नतेच्या पोतानें सुखावतात आणि पोटभर हसतात !

दिग्दर्शक रावते यांनीं हें नाटक आपल्या नेहमीच्या सफाईनें, परिश्रमपूर्वक बसवलें आहे. गुलाब कोरगांवकर व सिनेनट सूर्यकांत ह्यांनीं निळावंती व मास्तर ह्या भूमिका मन लावून कसलीही कुचराई न करतां केल्या. गुलाब कोरगांवकर तमाशांतील अस्सलबाई उभ्या करूं शकल्या नाहीत. करुण प्रसंगीं त्या अभि-नयात बऱ्याच कमी पडतात. आमनेसामनेचे प्रसंग निव्वळ आक्रस्ताळीपणानें निभावून नेतात. सूर्यकांतांचा रंगभूमीवरील मास्तर पाहून 'शिकवनं थोडं, छड्या जादा आन् माया त्याहुन बी जादा देनारा' आणि निळेच्या दृष्टीनं, 'मुक्या पाखरांना देखील पहाट झाल्याचं कळतं. पण सकाळ झाली तरी पत्ता' न लागलेला, खेड्यांतला मराठी शाळेंतला भाबडा, निष्पाप मास्तर आपणां समोर वावरतो आहे हें मुळीं पटलंच नाहीं! प्रणयी जोडीसाठीं निवडलेले हे कलावंत अगदींच 'अन्फिट' नसले तरी बरेच 'मिसफिट' वाटले—त्यांच्या प्रयत्नांची शिकस्त मान्य करूनहि! नाटकांतली गेन्या ही व्यक्तिरेखा सर्वांत रेखीव. शंकर घाणेकरांनी ती फुलवली अत्यंत सफाईनं. रंगमंचावरील त्यांच्या हालचाली, एकेक विनोद सादर करण्याच्या लकबी खास त्यांच्या ठेवणी-



अनुक्रमणिका

तल्या ! अक्षरशः धमाल उडवून 'दावून' हंशा मिळविले त्यांनीं ! खडाष्टकांतल्या वक्र तुंडानंतर त्यांच्या वांट्याला आलेली ही एक चांगली भूमिका. त्याचा चोख फायदा घेतला नाहीं तर ते घाणेकर कसले ? वसंत शिन्दे ह्यांची निळावंतीचा स्वार्थी, उग्र व हुकमी बोलणारा काका गणपा ही आणखी एक उत्कृष्ट भूमिका. इतर दुय्यम पात्रंही ठाकठीक होतीं.

नाविन्यपूर्ण कलात्मक नेपथ्य व कल्पक प्रकाशयोजना ह्यांनी 'निळवंती' नटली आहे, उजळली आहे. श्री. श्याम आडारकर यांचे नेपथ्य म्हंटलें कीं श्री. चंद्रकांत होनावर यांची प्रकाशयोजना हें गणित ठरूनच गेल्यासारखें आहे. नाटकांतल्या मास्तरांसारखें हें गणित चुकलेलें नाहीं. रीतही बरोबर, उत्तरही बरोबर. असं असलं तरी पैकीच्या पैकी मार्क देतां येणार नाहींत. ह्याचं प्रमुख कारण म्हणजे दोन प्रवेशां मधील नेपथ्यासाठीं लागणारा कंटाळवाणा मध्यंतर ! नेपथ्य नको, मध्यंतर आवर असं तीव्रतेनं वाटण्या इतपत असल्या मध्यंतरानें प्रेक्षकांचा अंत पाहिला. 'मुंबईतला मराठी माणूस जशी आपली गाडी सहसा चुकवीत नाहीं, तसा तो चांगलें नाटकही चुकवीत नाहीं.' हे जितकं खरं, तितकंच ही गाडी वेळेवर आली नाहीं कीं हा मराठी माणूस चरफडतो हेंही खरं ! म्हणूनच पडद्याला टाळी पडण्याऐवजीं मध्यंतरालाच (निषेधाच्या) टाळया पडूं लागल्या.

असल्या प्रकारानें खूप रमद्दानी व्हायची. 'अंदाज चुकतो लई येळां. तसा त्येचा बी चुकला. पर त्येला काय करायचं ? बाकी ह्याक हाय काम त्येचं !'

नाटकांतील रागदारी संगीताचा साज एरवीं श्रवणीय वाटला तरी तमाशाच्या पार्श्वभूमीवरील ह्या नाटकांत अस्सल लावण्या व ठसकेदार नृत्यं अभावानेंच तळपलीं ! तमाशाच्या साथीचा वाद्यवृंद सुद्धां पडद्यावरच दिसला. त्यामुळें तमाशा व नाटक ह्यापेक्षांही अधिक रंगणारा मराठी माणूस तमाशांतील नाचगाण्याचें हें असलं नाटक पाहून निराळया अर्थानें 'गार' होतो !

प्रस्तुत नाटक रंगभूमीवर आणण्यासाठीं, नाटकाचे वैशिष्ट्यपूर्ण व रेखीव प्रयोग सादर करणारे रावते, आडारकर आणि मंडळी व ख्यातनाम नटसंच मिळाल्याबद्दल श्री. सवनीसांचें अभिनंदन ! त्यांचा जोंधळा भाताच्या जमिनींत लावला गेला नाहीं. त्यांच्या पिकाला योग्य अशीच जमीन मिळाली आणि पहिल्याच प्रयोगांत प्रेक्षकांना आकर्षित करण्याचें यश सवनीसांना मिळालें ! मुळांत चांगला असलेला नाट्यविषय खुबीदारपणें, नेटक्या बांधणीनें, वेगळ्या धाटणीनें मांडण्यांत यश मिळविल्यानुळें त्यांच्या हातून अशीच चांगलीं नाटकें लिहिलीं जावोत ही सदिच्छा

—रसिक मनोहर

# जनतेचा विकास घडविणारी कामधेनु

आपल्या महाराष्ट्र राज्य सरकाची ही लोककल्याणकारी आणि अनेक चांगल्या योजनांपैकीं एक उल्लेखनीय अशी उत्तम योजना. दारुबंदी योजनेला अखिल भारतीय राज्य घटनेंत स्थान मिळण्यापूर्वीच आपल्या या प्रगतिशील राज्यानें या सुधारणावादी योजनेची अंमलबजावणी केली. आणि सर्व प्रांतांत, सर्व बाबतींत नेहमींच महाराष्ट्र अग्रेसर हें सिद्ध केलें. भारतीय नियोजन मंडळ सर्व भारतांत 'दारुबंदी' करण्यासाठीं कांहीं योजना आंखीत आहे असें ऐकिवांत येत असतानांच–कित्येक ठिकाणीं तिच्या यशस्वितेबद्दल नाना शंकाकुशंका–व विरोधही व्यक्त केला जात आहे–प्रत्यक्ष कॉंग्रेस पक्षही याला अपवाद नाहीं–तेथेंही मोठे मतभेद आहेत–पण आपल्या समाजाचा सार्वत्रिक विकास साधणारी ही कामधेनु आहे–हें जनतेला पटवायला हवें–राहणीचें मान, आरोग्य वगैरे उद्दिष्टें प्राप्त करून देणाऱ्या या योजनेची निर्दोष अंमलबजावणी व्हायला हवी व त्यासाठीं कायद्याबरोबर जनतेची सहकार्याची भावनाहि प्रामुख्यानें हवी. ही भावना प्रज्वलित करण्यासाठीं जनतेंत मोठ्या प्रमाणावर प्रचार व्हायला हवा–त्यासंबंधाचें शिक्षण द्यायला हवें. आणि म्हणूनच, सर्व महाराष्ट्र राज्यांत सुरूं होत असलेल्या 'मद्यपानबंदी सप्ताहा' चें महत्व. त्याचें आम्ही स्वागत करतों.

दारुबंदी कायद्याच्या अंमलबजावणींत अनेक दोष आहेत (हें सरकारलाही माहित आहे) व त्यामुळें पुष्कळदां जनतेच्या हिताची अशी ही प्रभावी योजना, फसल्याचाही भास होतो; याची सरकारला जाणीव आहे व तशी कबुलीही सरकारनें दिली आहे–आणि ती यशस्वी व्हावी म्हणून दोष काढण्याचा प्रामाणिक प्रयत्नही सतत चालू ठेवला आहे–तरीहि तिच्या आवश्यकतेचें महत्व कमी होत नाहीं–प्रत्येक नागरीकानें सरकारच्या या लोकहितकारी व प्रभावी योजनेला मनापासून पाठिंबा दिल्यास, राष्ट्रपिता महात्मा गांधींचें एक अपूर्ण आणि अपूर्व स्वप्न प्रत्यक्षांत पहाण्याचें भाग्य लाभेल. महाराष्ट्र राज्याच्या या उत्तम उद्देश असलेल्या योजनेस आम्ही आमचा मनःपूर्वक पाठिंबा व्यक्त करतों, आणि ती सुफलीत व्हावी म्हणून चाललेल्या या प्रामाणिक प्रयत्नांस दिपावलीतर्फे शुभ्र चिंतितों—

# कासवाची पंचवीस वर्षांची वाटचाल

देशमुख आणि कंपनीचें मानचिन्ह कासव आहे. या कासवानें पंचवीस वर्षांचा टप्पा पाडव्याच्या शुभमुहुर्तावर ओलांडलेला आहे. हें कासव आपल्या गतीनें चाललें. या पंचविस वर्षांत त्याच्या टणक पाटीवर अनेक तऱ्हेचे प्रहार झाले. कधीं त्याला सपाट ओलसर जमीन मिळाली; कधीं तप्तभूमीवरून त्यानें प्रवास केला; तर कधीं खडकाळ उंचवटे त्याला भिववूं लागले; पण हें कासव डगमगलें नाहीं. आपल्या बरोबर शर्यत लावणारे ससे मुक्कामाला पोंहोचले, कीं मध्येंच झोपीं गेले हेंहि त्यानें पाहिलें नाहीं. शक्य तेव्हां आपल्या मंदगतींत त्यानें वाढ केली, आणि मुक्काम गाठला. पण हा मुक्काम गांठला म्हणुन तें हर्षातिशयानें नाचत नाहीं; किंवा तें हुरळलेंहि नाहीं. त्याला पुढें जायचें आहे. अजून पुढचा टप्पा गांठायचा आहे. तें कुठल्या दिशेला वळेल, कसा वळसा घेईल, आणि कुठें जाईल हें सांगतां येणार नाहीं. आपल्या गतीनें–जसें आतांपर्यंत चाललें तसेंच–तें चालेल. पुढें पुढें जाईल. त्याला अधिकाधिक सामर्थ्य प्राप्त होवो अशी शुभेच्छा व्यक्त करतों.

# सचोटीचें फळ

'व्हीनस प्रकाशन' या संस्थेनें रौप्य महोत्सव साजरा केला. दोन ध्येयवादी तरुणांनी स्थापन केलेल्या या संस्थेचा हा भाग्य-दिन. १९४७ सालापासून गेली पंचवीस वर्षें आपल्या अविश्रांत श्रमाचें खत–पाणी घालून या संस्थेचें मालक स. कृ. पाध्ये यांनीं ही संस्था आज एवढ्या भरभराटीला आणली. आणि सं

स्वतःच्या इमारतींत नांदायला नेली. लेखकांशीं, समव्यवसायिकांशीं आणि गिऱ्हाईकांशीं सचोटीनें वागण्याबद्दल पाध्यांचा लौकिक आहे. आपली संस्था पाश्चात्यांच्या तोडीची व्हावी म्हणूनहि त्यांचे अविरत प्रयत्न चालू आहेत. अनेक अडचणींना तोंड देतं आजचा धन्य दिवस ते पाहात आहेत. त्यांच्या मनिषा पूर्ण व्हाव्यात आणि त्यांच्या संस्थेची भरभराट व्हावी हीच सदिच्छा !

## चिंतनशील विद्वत्तेचा विशुद्ध गौरव

मराठी भाषेंतील सर्वोत्तम ग्रंथ म्हणून यंयाच्या साहित्य अकादमीच्या सर्वोच्च पारितोषिकाचा मान श्री. पुरुषोत्तम यशवंत देशपांडे यांच्या ' अनामिकाची चिंतनिका ' या पुस्तकाला मिळाला. आकारानें लहान पण विचारानें महान् असें हें अप्रतिम पुस्तक म्हणजे मराठी साहित्यांतील एक अमोलिक ठेवा आहे. श्री. देशपांड्यांच्या प्रदीर्घ तत्त्वचिंतनाचें तें फळ आहे. 'बंधनाच्या पलीकडे', ' सुकलेलें फूल ', 'काळी राणी', विशाल जीवन इत्यादि पुस्तकें ज्यांनीं वाचली असतील त्यांना देशपांड्यांच्या या तत्वचिंतक ग्रंथाबद्दल आश्चर्य वाटेल, पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर देशपांड्यांच्या कथा, कादंबरी व काव्यांत आजच्या या तत्त्वज्ञानाचा आविष्कार झालेला निश्चित आढळतो. त्या विचारांची प्रतिबिंबें त्यांच्या वरील ललित ग्रंथांत उमटलेलीं आहेत. देशपांड्यांनी आपल्या पुढील पिढीला एका विशिष्ट ढंगाची प्रगल्भ भाषा दिली. चिंतनिकेच्या द्वारें हा जो आपल्या काव्यात्म बुद्धीचा अर्क पुढील पिढीला त्यांनी दिला त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करतों. व उत्तरोत्तर त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो असें इच्छितों.

## सरकारी माणसाला सरकारचें पारितोषिक

१ जानेवारी १९६१ ते १४ ऑगस्ट १९६२ या काळांतील उत्कृष्ट मराठी चित्रपटांना व प्रथम श्रेणींच्या सर्व कलावंताना महाराष्ट्र सरकारनें पारितोषिकें जाहीर केलेलीं आहेत. सर्वोत्कृष्ट गीतकार, कथाकार व पटकथा लेखक म्हणून आमचे परममित्र श्री. गजानन माडगूळकर यांना पहिल्या क्रमांकाचीं तीन बक्षिसें मिळालीं.

' त्यांच्या मनांतला व्यास त्यांना सांगतो व हा गजानन आपल्या हातांनी केवळ उतरून घेतो ' असें त्यांचें वर्णन सर्वश्री पु. ल. देशपांडे यांनीं एकदां केलं होतं. गेल्या वीस वर्षांत माडगूळकरांनी जे स्थान निर्माण केलेलें आहे तें ' एकमवाद्वितीय ' असें आहे. कवि, कथा-लेखक, कादंबरीकार श्रेष्ठ नट अशा अनेक भूमिका यशस्वी रीतीनें ते करीत आहेत. हिंदी चित्रपटसृष्टीत त्यांनीं प्रवेश केला तेव्हां तिथेंहि त्यांनीं राष्ट्रपतींचें पारितोषिक मिळविलें होतें. त्यांच्या प्रतिभेचा विलास चतुरस्त्र आहे. खडतर पूर्वायुष्यानुभव त्यांच्या प्रतिभेला नित्य उजाळा देत आहत. जीवन कळलेला आणि कीर्ति शिखरावर असूनहि मी पणाचा लेशहि नसलेला असा हा माणूस. दीपावलीतर्फे त्यांचें आम्हीं हार्दिक अभिनंदन करतों.—**गोपालन्**



पान ५ वरून

कलावान त्यांत होते. आणि या सर्व परीक्षकांनीं मिळून शेवटीं आपापल्या विभागांतून उत्कृष्ट ठरलेल्या **चित्रांतून निवड करून सुवर्णपदकाचें चित्र निवडावयाचें** असेही ठरलें होतें. अशा परीक्षकांना आपापल्या विभागांत सुवर्णपदकासाठीं एकही योग्य चित्र दिसलें नाहीं याला 'नव्या दमाची' कमिटी काय करणार ?

या पूर्वीसुद्धां सुवर्णपदक अनेकवेळा न दिल्याचें स्मरणांत नसावें.

( ५ ) आतां प्रदर्शनांतील चित्रांच्या मांडणीबद्दल. सर्व चित्रें प्रथम परीक्षकांनी निवडलेलीं असतात हें आपण जाणत असालच. त्यांत एकादें सामान्य चित्र निवडलें गेलें असलें तर तो कमिटीचा दोष नव्हे कीं लावणारांचाही नव्हे तेव्हां वजनदार चित्राच्या बाजूला अतिसामान्य चित्रें लावणें ही मांडणी करणाराची चूक नव्हे. आपल्या म्हणण्याप्रमाणें ' वजनदार ' चित्रांचा एक विभाग व सामान्य चित्रांचा दुसरा असा असावा कीं काय? हा जातिभेद कलेंत कशाला ?

( ६ ) ' सर्वांना खूष ' करण्यासाठीं ही सर्व नवीन मांडणी व विभाग कमिटीनें केले आहेत हें विधान बरोबर नाहीं. उलट यामुळें आधुनिक व आंतरराष्ट्रीय विचारांच्या गोऱ्या व काळ्या साहेबांना नाखूष केल्याचें पुण्य मात्र कमिटीच्या पदरीं पडलें आहे.

( ७ ) शेवटीं आपण लिहिता कीं नाणावलेल्या चित्रकारांची गैरहजेरी वाटली. हुसेन, चावडा, हेब्बर, आंबेरकर आदि सर्व चित्रकार तेथें होते. कांहींनीं भाग घेतला नाहीं हा दोष कोणाचा ? आणि नवोदितांनीं केलेल्या अपेक्षाभंगाबद्दल आपण कमिटीला कां जबाबदार धरतां ?

आपला,

**माधव सातवळेकर**

